 REGD. MO: SAT 3

# नवभारत

या अंकात –



वर्ष २९
अंक पांचवा
फेब्रुवारी १९७६
रु. १–२५

अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई



नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)




महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com




# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

## 'पद्मभूषण' तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

भारत सरकारकडून 'पद्मभूषण' हा सन्मान मिळाल्याबद्दल

**हार्दिक अभिनंदन**

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई, यांचे मासिक

# नवभारत

( महाराष्ट्रराज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

**संपादक मंडळ**

प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. मे. पुं. रेगे

(का. संपादक)

**मूल्य रु. १–२५**

**वार्षिक रु. १२**

**वर्ष : एकोणतिसावे**

**अंक : पांचवा**

**फेब्रुवारी १९७६**

मुद्रक– **रं. ब. जोशी**

प्रकाशक– **वि. म. बेडेकर**

दी प्राज्ञ प्रेस,

३१५, गंगापुरी,

वाई (जि. सातारा)



**पत्रव्यवहार : १ संपादकीय–** कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, प्राध्यापकांचे निवासस्थान, कीर्ति कॉलेज, दादर–मुंबई– ४०००२८.

२ **व्यवस्थापकीय–** व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा ) ४१२८०३

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. सत्यरंजन साठे

# सेक्युलर स्टेट आणि भारताची राज्यघटना

'सेक्युलर स्टेट'ची कल्पना मूलतः व्यक्तिस्वातंत्र्याच्या पाठपुराव्यातून जन्मली. धर्माधिष्ठित राज्यांत व्यक्तीच्या स्वातंत्र्याचा संकोच होतो. शासनाला जो धर्म मान्य असेल त्याखेरीज इतर धर्मांच्या उपासकांना पक्षपात सहन करावा लागतो. युरोपच्या इतिहासात धार्मिक राज्यांनी अल्पसंख्यांकांवर केलेल्या जुलुमांची उदाहरणे अनेक आहेत. ह्यापैकी बऱ्याच अल्पसंख्य जमाती अमेरिकन वसाहतीत जाऊन राहिल्या. अमेरिका स्वतंत्र झाल्यावर आपल्यावर तसा जुलूम पुन्हा होऊ नये म्हणून त्यांनी संपूर्णपणे इहवादी राज्याची ( सेक्युलर स्टेट ) कल्पना अमेरिकन राज्यघटनेमार्फत साकार केली. इंग्लंडमध्ये प्रोटेस्टंट धर्माचे राज्य आहे. परंतु संसदीय लोकशाहीच्या परंपरा तेथे इतक्या खोलवर गेल्या आहेत की धर्माच्या कारणावरून पक्षपात प्रत्यक्षात घडत नाही. शिवाय इंग्लंड हे मुख्यतः एकसंध जमातीचे राष्ट्र आहे. त्यामुळे इहवादी राज्याची गरज तेथे भासली नसावी. अमेरिका हे अनेक जमातींचे राष्ट्र आहे. अशा बहुविध ( plural ) समाजात कुठल्याही एका धर्माला बांधलेले सरकार असणे हे देशाच्या एकतेला आणि पर्यायाने लोकशाहीला घातक ठरू शकते.

भारताच्या स्वातंत्र्याला सगळ्यात मोठा अडथळा होता जातीय वैमनस्याचा. काँग्रेस पक्षाने प्रथमपासून स्वतंत्र भारतात सेक्युलर स्टेट असेल अशी भूमिका घेतली. भारताच्या राज्यघटनेत जरी 'सेक्युलर' हे शब्द नसले तरी घटनेला सेक्युलर स्टेटच अभिप्रेत आहे हे स्पष्ट आहे. नुकतेच केशवानंद भारती' खटल्यात सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायाधीशांनी 'सेक्युलर स्टेट' हे घटनेचे, सारभूत अंग ( Essential feature) आहे असे मत दिले.' मात्र भारतीय राज्यघटनेतील सेक्युलर स्टेटचे मॉडेल ( model ) हे इतर कुठल्याही अस्तित्वात असलेल्या मॉडेलची, अमेरिकन मॉडेलची सुद्धा नक्कल नाही. जरी अमेरिकन राज्यघटनेतून आपल्या घटनाकारांनी स्फूर्ती घेतली असली तरी अनेक



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बाबतीत भारतीय समाजाच्या विशिष्ट गरजा आणि आकांक्षा ह्या लक्षांत घेऊन भारतातले सेक्युलर स्टेट हे काहीसे वेगळे, स्वतःचे वैशिष्टच असलेले, त्यांनी घडविले.

डी. स्मिथने लिहिलेल्या "इंडिया अॅज ए सेक्युलर स्टेट" ह्या ग्रंथात सेक्युलर स्टेटची तीन लक्षणे सांगितली आहेत[१]: (१) शासनाने व्यक्तीस धर्म–निरपेक्ष भूमिकेवरून वागवावे. व्यक्तीचे नागरिकत्व, त्याचे अधिकार हे त्याच्या धर्मावर अवलंबून नसावेत. कुठल्याही व्यक्तीविरुद्ध ती अमूक धर्माची आहे ह्या कारणास्तव पक्षपात होऊ नये; (२) व्यक्तीला धर्माबाबत संपूर्ण स्वातंत्र्य असावे; (३) शासन व धर्म ह्यांची क्षेत्रे संपूर्णपणे वेगळी असावीत. शासनाने कुठलाही धर्म स्थापू नये, त्यास मान्यता देऊ नये अगर त्यावर बंधने घालू नयेत.

## शासन व व्यक्ती

वरील तीन पैकी पहिले तत्व हे शासन व व्यक्ती ह्यांच्या संबंधाबाबतचे आहे. भारतीय राज्यघटनेत हे तत्व काटेकोरपणे अंगिकारलेले दिसते. शासनाने सर्वांना कायद्याने समान लेखाने (कलम १४) धर्म, जात इ. कारणांवरून पक्षपात होऊ नये (कलम १५, १६) अस्पृश्यता नष्ट व्हावी आणि अस्पृश्यता पालनास शिक्षा व्हावी (कलम १७). मतदानाचा अधिकार सर्व प्रौढ व्यक्तींना आहे व त्याबाबत धर्माच्या अगर जातीच्या कारणावरून पक्षपात होऊ नये (कलम ३२५) ह्या तरतुदी पाहिल्यास हे स्पष्ट व्हावे. राष्ट्रपती, उपराष्ट्रपती, संसद किंवा विधानसभा सदस्य, न्यायाधीश ह्यांच्या निवडीबाबत धर्माची अट नाही. ह्या समानतेच्या तत्वाला फक्त दोन अपवाद सांगता येतील. एक म्हणजे अनुसूचित जमातींना मिळणाऱ्या विशेष सवलती व अधिकार [कलम १५ (४) व १६ (४)] आणि विविध धर्माच्या लोकांना लागू होणारे विवाह, घटस्फोट, वारसाहक्क ह्या बाबतचे धर्मावर आधारलेले कायदे. ह्यापैकी पहिला अपवाद सामाजिक न्यायावर आधारलेला आहे. त्यामागे सामाजिक परिवर्तनाचा महान उद्देश आहे. दुसरा अपवाद म्हणावा. कारण हे निराळे कायदे धर्माच्या कारणावरूनच आहेत. मात्र त्यात पक्षपात नाही. शिवाय स्पेशल मॅरेज अॅक्टखाली कुणालाही विवाह करता येतो. हा कायदा म्हणजे समान नागरी कायदाच (युनिफॉर्म सिव्हिल कोड) आहे. फक्त आज तरी तो सक्तीचा नाही. समान नागरी कायदा करण्यास शासन बांधलेले आहे. (कलम ४४) हिंदू कायद्याचे जसे आधुनिकीकरण झाले तसेच इस्लामी कायद्याचे होणे आवश्यक आहे. ह्यातूनच समान नागरी कायद्याचे स्वप्न साकार होईल. पण ह्यास वेळ लागणार हे निश्चित.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

### व्यक्तीचे धार्मिक स्वातंत्र्य

पहिले तत्व वरील अपवाद सोडता भारतीय राज्यघटनेत संपूर्णपणे अंगिकारण्यात आले आहे आणि त्याबाबत भारतीय राज्यघटना आणि अमेरिकन राज्यघटना ह्यांत साम्य आहे. दुसरे तत्व असे की व्यक्तीला धर्माबाबत, त्यावर श्रद्धा ठेवण्याचे, त्याप्रमाणे आचरण करण्याचे आणि धर्माचा प्रचार करण्याचे स्वातंत्र्य हवे. अमेरिकन घटनेत पहिल्या घटनादुरुस्तीने वरील स्वातंत्र्य देण्यात आले. त्याची कार्यवाही करताना मात्र अमेरिकन सर्वोच्च न्यायालयाने त्यावर काही मर्यादा घातल्या, धार्मिक स्वातंत्र्यावर मर्यादा घालण्याचा शासनाचा अधिकार भारतीय घटनेत अमेरिकेपेक्षा जास्त व्यापक आहे. युरोपमध्ये रेनेसान्स चळवळीने धर्माचे क्षेत्र मर्यादित झाले होते. रेफर्मेशनने धर्मात अंतर्गत परिवर्तनही घडवून आणले होते. अमेरिकन घटना तयार होण्यापूर्वी युरोपमध्ये वरील घटना घडल्या होत्या. धर्माचे क्षेत्र मर्यादित झाल्यामुळे सामाजिक व्यवहारात धर्माचा हस्तक्षेप जवळजवळ संपला होता. धर्माला त्याच्या मर्यादित क्षेत्रात संपूर्ण मुभा द्यायला काहीच हरकत नव्हती. भारतात तशी परिस्थिती नव्हती. हिंदू आणि इस्लाम हे धर्म जवळजवळ सर्व सामाजिक आचार-विचारांचे नियंत्रण करत होते. त्यामुळे धर्माचे क्षेत्र मर्यादित करण्यास शासनाला प्रयत्नशील राहणे अवश्य होते.

भारताच्या राज्यघटनेचे आणखी एक वैशिष्ट्य असे की ती केवळ शासनाकडून होणाऱ्या किंवा होऊ शकणाऱ्या जुलमाचा प्रतिकार करीत नाही. तशा संभाव्य जुलमाचा प्रतिकार करण्यास ती व्यक्तीस सिद्ध तर करतेच, पण त्याहून महत्त्वाचे म्हणजे इतर व्यक्तींकडून होणाऱ्या जुलमाविरुद्धही ती व्यक्तीस योग्य तो प्रतिकार करण्यास सिद्ध करते. उदा० कलम १७ ने अस्पृश्यता नष्ट झाल्याचे सांगते. किंवा कलम १५ (२) मध्ये सार्वजनिक दुकाने, उपहारगृहे, चित्रपट किंवा इतर सार्वजनिक सभागृहे ह्यांत व्यक्तीविरुद्ध त्याच्या जातीवरून अगर धर्मावरून पक्षपात होऊ नये असे बजावते. ह्यावरून एक महत्वाचा फरक अमेरिकन व भारतीय घटनांमध्ये आहे तो लक्षात घ्यायला हवा. अमेरिकेच्या ( म्हणजे युनायटेड स्टेट्स ) राज्यघटनेत जे मूलभूत अधिकार व्यक्तीस दिले गेले आहेत ते केवळ शासनाविरुद्ध उपलब्ध आहेत. पहिल्या दहा घटनादुरुस्त्यांनी हे अधिकार प्रथमतः दिले. पण ते फक्त केंद्र सरकार विरुद्धच उपलब्ध होते. चौदाव्या घटनादुरुस्तीने राज्यांविरुद्धही ते उपलब्ध झाले. परंतु हे अधिकार फक्त शासकीय कार्यवाहीविरुद्धच ( State action ) उपलब्ध आहेत. अमेरिकेतील सर्वोच्च न्यायालयाने " शासकीय कार्यवाही " ( State action )



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ह्या संकल्पनेचा जास्तीत जास्त उदार अन्वयार्थ लावून हे अधिकार शासनाच्या अप्रत्यक्ष मदतीने कार्य करणाऱ्या खाजगी संस्था विरुद्धही मिळवून दिले. ह्याचा फायदा वर्णद्वेषाविरुद्ध झगडणाऱ्या निग्रोंना भरपूर मिळाला. अमेरिकेचा अनुभव लक्षात घेऊन असेल किंवा भारतातील जातिव्यवस्थेतील दोषांना जीवदान मिळू नये म्हणून असेल, पण आपल्या घटनाकारांनी घटनेतच मूलभूत अधिकार केवळ शासनाविरुद्ध न देता ते समाजाविरुद्ध आणि समाजातील प्रबळ घटकांविरुद्ध दुर्बळ घटकांना मिळतील ह्याची खबरदारी घेतली.

भारतीय राज्यघटना व्यक्ति–स्वातंत्र्य हे मूल्य मानते. म्हणूनच तीत मूलभूत अधिकारांचा समावेश आहे. मार्गदर्शक तत्वांमध्ये सामाजिक व आर्थिक पुनर्रचनेचा आराखडा आहे. नवीन समाज व्यवस्था व अर्थव्यवस्था जास्त न्याय्य व्हावी हे उद्दिष्ट आहे. शेवटी न्याय्य म्हणजे काय ? तर ज्यात व्यक्ती स्वतःचा विकास साधू शकेल, ज्यात तिचे व्यक्तिमत्त्व विकसित होईल अशी व्यवस्था. व्यक्तीस केवळ राजकीयच नव्हे तर सामाजिक आणि आर्थिकदृष्टचा स्वतंत्र करणे हीच ह्या परिवर्तनामागची भूमिका आहे. अर्थात व्यक्ति-स्वातंत्र्य अमर्यादित असू शकत नाही. त्यामुळे व्यक्तिस्वातंत्र्याकरता असे अधिकार द्यायचे तसेच व्यक्ति–स्वातंत्र्याकरताच त्यावर मर्यादा घालायच्या. व्यक्तीच्या धर्मविषयक स्वातंत्र्याचा विचार करताना आणि त्याच्या सीमा ठरवताना सामाजिक आणि आर्थिक परिवर्तनाचा संदर्भ मनात सारखा बाळगावा लागतो.

कलम २५ ने व्यक्तीला धर्मावर श्रद्धा ठेवण्याचे, त्याप्रमाणे आचरण करण्याचे आणि त्याचा प्रचार करण्याचे स्वातंत्र्य दिले आहे. पैकी धर्मावर श्रद्धा ही संपूर्णपणे व्यक्तीची खाजगी बाब आहे. नुसती श्रद्धा असण्याने त्याचा इतरांशी संघर्ष होत नाही. ती व्यक्ती जेव्हा श्रद्धेनुसार आचरण करू लागते तेव्हाच अशा संघर्षाची शक्यता निर्माण होते. अमेरिकेतील सर्वोच्च न्यायालयाने धर्मावर श्रद्धा ठेवणे आणि धर्माप्रमाणे आचरण करणे ह्यातील सूक्ष्म भेद विशद करून पहिले स्वातंत्र्य अमर्यादित आहे तर दुसरे अमर्यादित नाही असे सांगितले. भारतीय घटनेत मात्र असा भेद केलेला नाही. कलम २५ ने दिलेल्या तिन्ही अधिकारांवर ( श्रद्धा ठेवणे, आचरण करणे, प्रचार करणे ) सारखीच बंधने त्या कलमात सांगितली आहेत. कलम २५ हे मूलभूत अधिकारांच्या प्रकरणामधले इतरांपेक्षा निराळे असे कलम आहे. इतर सर्व कलमांची रचना आणि कलम २५ ची रचना ह्यात एक सूक्ष्म भेद आहे तो लक्षात घ्यायला हवा. हा भेद दुर्दैवाने सर्वोच्च न्यायालयाने देखील पुरेसा महत्वाचा मानलेला दिसत नाही. परंतु हा भेद प्रा. पी. के. त्रिपाठी ह्यांनी आपल्या लेखात[3] मांडला. इतर सर्व कलमांमध्ये प्रथम



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अधिकाराची घोषणा आहे आणि त्यानंतर त्या अधिकारावर शासन कुठल्या मर्यादा घालू शकते त्याचा तपशील आहे. कलम १४ ने शासनाने सर्वांना समान वागणूक द्यावी असे सांगितले आहे. ह्या हुकुमास अपवाद न्यायालयीन पुनरवलोकना मार्फत आकारास आले. कलम १५ ( १ ) व कलम १६ ( १ ) मध्ये धर्म, वंश जात, लिंग, जन्मस्थान इ. कारणांवरून किंवा ह्या पैकी कुठल्याही कारणावरून पक्षपात होऊ नये हा अधिकार सांगितला आहे. ह्यानंतर त्यास अपवाद उपकलम १५ ( ३ ) मध्ये शासनाने स्त्रिया व मुलें ह्यासाठी व १५ ( ४ ) मध्ये मागासलेल्या जमातींसाठी विशेष सवलती द्याव्यात असे सांगून मांडले आहेत. कलम १९ ( १ ) मध्ये नागरिकास भाषणस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य, संघटना स्वातंत्र्य, रहिवासाचे स्वातंत्र्य, भारतात कुठेही जाण्याचे स्वातंत्र्य, मालमत्ता मिळवण्याचे, जतन करण्याचे किंवा तिचा विनियोग करण्याचे आणि व्यवसायाचे स्वातंत्र्य दिले आहे. त्या कलमाच्या उपकलम (२) ते (६) मध्ये वरील अधिकारांवर कुठल्या कारणांस्तव मर्यादा लादायचा अधिकार शासनाला आहे ते सांगितले आहे. पहिले अधिकार आणि मग मर्यादा असा क्रम सर्व कलमांमधून दिसतो. परंतु कलम २५ ची सुरुवातच "Subject to public order, morality and health and to the other provisions of this Part" ह्या शब्दांनी होते. ह्या शब्दांनंतर "all persons are equally entitled to freedom of conscience and the right to profess, practise and propagate religion" असे शब्द येतात. म्हणजे व्यक्तीचे धर्मावर श्रद्धा ठेवण्याचा, त्याप्रमाणे आचरण करण्याचा आणि त्याचा प्रचार करण्याचा ह्या अधिकारांवर मुळातच सार्वजनिक सुव्यवस्था, नीतिमत्ता आणि स्वास्थ्य ह्यासाठी केलेल्या कायद्यांचे आणि व्यक्तीस मिळालेल्या इतर मूलभूत अधिकारांचे बंधन आहे. हे कायदे अगर हे अधिकार धर्मस्वातंत्र्याचे अपवाद नसून धर्मस्वातंत्र्यच वरील कायद्यांनी आणि अधिकारांनी न व्यापलेल्या क्षेत्रापुरते मर्यादित झाले आहे. इतर कुठल्याही मूलभूत अधिकारावर इतर मूलभूत अधिकारांचे बंधन नसताना फक्त कलम २५ वरच ते बंधन लादण्यात काय हेतू होता ? धर्म-स्वातंत्र्य हे व्यक्ति-स्वातंत्र्याचा भाग आहे. पण जर त्या स्वातंत्र्याचा उपयोग व्यक्तीच्या इतर मूलभूत अधिकारांचा संकोच करण्यात झाला अगर होऊ शकला तर मुख्य हेतूच डावलला जाईल. वरील शब्दयोजनेमुळे सार्वजनिक सुव्यवस्था, नीतिमत्ता किंवा स्वास्थ्य ह्यांसाठी केलेले कायदे व्यक्तीच्या धर्म-स्वातंत्र्याशी विसंगत आहेत असा आक्षेप घेता येत नाही. जर व्यक्तीचे धर्म-स्वातंत्र्य प्रथम सांगून

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वरील कारणास्तव मर्यादा घालण्याचा अधिकार शासनाला दिला असता तर अशा कायद्यांना वरील आक्षेप घेता आला असता आणि मग ते कायदे वैध आहेत किंवा नाही ते न्यायालयांना ठरवावे लागले असते. पण वरील कायद्यांनी धार्मिक स्वातंत्र्याला मर्यादा घातलेल्या नसून मुळातच धर्म–स्वातंत्र्य हे त्या कायद्यांनी न नियंत्रित केलेल्या व्यवहारांपुरते आहे. तेच मूलभूत अधिकाराबाबत म्हणता येईल. ह्याचा परिणाम असा की अस्पृश्यता–पालन हा माझा धर्म-स्वातंत्र्याचा भाग आहे असा दावा कुणी करू शकत नाही. कारण कलम १७ ने अस्पृश्यता नष्ट केली असल्यामुळे अस्पृश्यता पालन हे धर्म–स्वातंत्र्य होऊच शकत नाही. धर्म स्वातंत्र्याचा हवाला देऊन कुणी सामाजिक असमानता राबवू लागला तर कलम १५ (२) कडे बोट दाखवून ते टाळता येते.

धर्म–स्वातंत्र्याचे क्षेत्र मुळातच मर्यादित करून घटनाकार थांबले नाहीत तर त्या स्वातंत्र्यावर त्यांनी दोन कारणास्तव मर्यादा घालण्याचा अधिकार शासनाला दिला : ( १ ) धर्माशी निगडित असलेल्या आर्थिक, द्रव्यविषयक, राजकीय व इतर ऐहिक ( सेक्युलर ) व्यवहारांचे नियंत्रण शासन करू शकते; ( २ ) सामाजिक कल्याण किंवा सुधारणा ह्या करता तसेच हिंदू देवालये हिंदू धर्माच्या सर्व घटकांना खुली करून देण्यासाठी शासन कायदे करू शकते.

व्यक्तीच्या धर्म–स्वातंत्र्यावर भारतीय राज्यघटनेत जेवढ्या मर्यादा घातल्या आहेत तेवढ्या अमेरिकी राज्यघटनेत नाहीत. कायदा व सुव्यवस्था किंवा स्वास्थ्य आणि नीतिमत्ता ह्यांच्या रक्षणार्थ अमेरिकी सरकारही धर्मस्वातंत्र्यावर बंधने घालते व तशी बंधने सर्वोच्च न्यायालय वैध मानते. परंतु वरील दोन कारणास्तव ज्या मर्यादा घालण्याचा अधिकार भारतीय राज्यघटना शासनाला देते तसा तो अमेरिकी राज्यघटना देत नाही. धर्म–स्वातंत्र्यावर "इतकी बंधने घालण्याचे कारण असे आहे की हिंदू आणि इस्लाम हे धर्म त्या दोन समाजाचे व्यक्तीच्या जन्मापासून मृत्यूपर्यंतचे सर्व व्यवहार नियंत्रित करतात. धर्माचा एवढा विस्तार जर मान्य करायचा झाला तर ह्या दोन समाजांना सेक्युलर असे काही जीवनात असूच शकत नाही. आणि ज्या देशांतले दोन मुख्य समाज इतके धर्माने बांधले गेले आहेत तेथे सेक्युलर स्टेट असणेही असंभवनीय होते. येथे जर सेक्युलर स्टेट असायचे असेल तर धर्माचे क्षेत्र मर्यादित झाले पाहिजे. धर्म, व्यक्ती आणि समाज ह्यांचे संबंध जसे पाश्चिमात्य देशांत असतात तसे ते येथे निर्माण झाले तरच सेक्युलर स्टेट येथे अस्तित्वात येऊ शकते, धर्माला जे अवास्तव मोठे स्थान भारतीय जीवनात आहे त्यामुळे देशाची, समाजाची आणि पर्यायाने त्या त्या धर्मांचीही हानी होते. म्हणून धर्म म्हणजे काय व



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्याचे व्यक्तीच्या सामाजिक जीवनावर कुठल्या मर्यादेपर्यंत नियंत्रण असावे हे ठरणे जरूर आहे. हे करण्याकरताच भारतीय घटनेत शासनाला धर्माशी निगडित असलेल्या सेक्युलर चालीरीतींचे नियंत्रण करण्याचा अधिकार देण्यात आला आहे. अमेरिकी राज्यघटनेतील सेक्युलर स्टेट आणि भारतीय राज्य घटनेतील सेक्युलर स्टेट ह्यांतील हा फरक महत्वाचा आहे. अमेरिकी सरकार व्यक्ती आणि धर्म ह्यांच्या संबंधाबाबत संपूर्णपणे अलिप्त राहते. ते व्यक्तीला धर्म–स्वातंत्र्य देते व त्याचे रक्षण करते. भारतात शासनाला धर्माचे क्षेत्र संकुचित करून मग धर्म–स्वातंत्र्याचे रक्षण करायचे आहे. ह्यामुळेच अमेरिकी राज्य-घटनेला अभिप्रेत असलेली शासनाची तटस्थता भारताच्या राज्यघटनेला अभिप्रेत नाही.

कलम २६ ने धार्मिक दाननिधींना व तत्सम संस्थांना खालील अधिकार दिले आहेत– ( १ ) धर्माच्या किंवा धर्मादायी हेतूने काढलेल्या संस्था स्थापन करणे व त्या चालवणे; ( २ ) धर्माच्या बाबतीत स्वायत्तता; ( ३ ) स्थावर व जंगम मालमत्ता मिळवणे आणि त्याची मालकी ठेवणे आणि ( ४ ) अशा मालमत्तेचे कायद्याप्रमाणे व्यवस्थापन पाहणे. कलम २५ प्रमाणेच कलम २६ ची सुरुवात. " subject to public order, morality and health " ह्या शब्दानीच होते. परंतु ह्या कलमात " subject to other provisions of this Part " हे शब्द नाहीत. वरील चार पैकी माल-मत्तेच्या व्यवस्थापनाचा अधिकार हा " कायद्याप्रमाणे " वापरता येत असल्याने व्यवस्थापनावर फार मोठ्या प्रमाणावर नियंत्रण शासनाला ठेवता येते. मात्र वरील चारपैकी धर्मांच्या बाबतीत स्वायत्तता हा अधिकार फक्त सार्वजनिक सुव्यवस्था, स्वास्थ्य आणि नीतिमत्ता यांच्या संरक्षणार्थच मर्यादित केला जाऊ शकतो. कलम २५ (२) प्रमाणे शासनाला धर्माशी निगडित असलेल्या 'सेक्यु-लर' बाबींचे नियंत्रण करता येते आणि २६ ( ब ) ने धर्माबाबत स्वायत्तता ( to manage its own affairs in matters of religion ) धार्मिक दाननिधींना दिली आहे. जेव्हा एखाद्या कायद्याने धार्मिक दाननिधींच्या स्वायत्ततेचा संकोच झाला असा आक्षेप घेण्यात येतो तेव्हा त्या कायद्याने नियंत्रण केलेली चाल, पद्धत अगर प्रथा ही धर्माची आवश्यक बाब आहे की धर्माशी निगडित अशी सेक्युलर बाब आहे हे न्यायालयांना ठरवावे लागते. ह्या मागचा हेतू पूर्वी सांगितल्याप्रमाणे धर्माचे क्षेत्र संकुचित करण्याचा आहे. अमेरिकन राज्यघटनेला अभिप्रेत असलेली शासनाची तटस्थता किंवा अलि-प्तता येथेही भारतीय घटनाकारांनी मुद्दाम नाकारलेली दिसते. त्यांनी मुद्दाम धार्मिक दाननिधींवर सामाजिक नियंत्रण ठेवण्याचा अधिकार शासनाला दिला.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि ह्याकरता "धार्मिक" व "सेक्युलर" असे सध्या ज्याला "धार्मिक व्यवहार" म्हणतात त्याचे भाग पाडले.

परंतु अमुक एक गोष्ट धर्माची "आवश्यक" बाब आहे की धर्माशी निगडित अशी सेक्युलर बाब आहे हे कसे ठरवायचे ? हे ठरवण्यासाठी न्यायालयांनी दोन पर्याय वापरून पाहिले आहेत. पहिला पर्याय हा की त्या धर्माच्या शिकवणुकीनुसार व धर्माच्या लोकांच्या रूढींनुसार अमुक पद्धत "आवश्यक" आहे किंवा नाही, हे पहायचे. दुसरा पर्याय हा की न्यायालयानेच काय 'आवश्यक' आहे ते ठरवायचे. दोन्हीत धोके आहेत. एक धोका असा की धर्मातल्या सनातनी शक्तींना एखादी पद्धती, रूढी, चाल अगर विचार 'आवश्यक' आहे असे सिद्ध करून देऊन व त्यायोगे तीस घटनेचे संरक्षण मिळवून सामाजिक परिवर्तनाची प्रक्रिया रोखता येईल. दुसरा धोका हा की आवश्यक काय हे ठरवण्याची मुख्य जबाबदारी न्यायाधीशावर पडल्यामुळे त्यांच्या सामाजिक दृष्टिकोनावर शासनाच्या पुरोगामी धोरणाची वैधता अवलंबून राहील. हे केवळ संभाव्य धोके नाहीत तर काही न्यायालयीन खटले व त्यांचे निर्णय पाहिल्यास ते वस्तुतः प्रत्यक्षात आहेत हे दिसून येते.

मुंबई राज्याने (महाराष्ट्र व गुजरात ही राज्ये होण्यापूर्वीचे) धर्माच्या कारणावरून सामाजिक बहिष्कार टाकणे (जातीबाहेर काढणे) ह्या प्रथेस मज्जाव करणारा कायदा The Bombay Prevention of Ex-Communication Act पास केला. बोहरा जमातीच्या प्रमुखाने ह्या कायद्याच्या वैधतेला हरकत घेतली[४]. त्याचे म्हणणे असे की एखाद्या व्यक्तीने धर्माप्रमाणे आचरण न केल्यास, किंवा धर्मगुरूचे आदेशानुसार वर्तन न केल्यास त्यास बहिष्कृत करायचा धर्मसंस्थेचा अधिकार हा त्या संस्थेच्या स्वायत्ततेचा भाग आहे व त्यात हस्तक्षेप करण्याचा शासनाला अधिकार नाही. बहिष्कृत झालेल्या व्यक्तीस त्या समाजाच्या अनेक सार्वजनिक सोयींना मुकावे लागते. त्याला दफनभूमीचा वापर करता येत नाही तसेच मशिदीत जाऊन प्रार्थना करता येत नाही. मुंबई हायकोर्टाने वरील कायदा वैध आहे असा निर्णय दिला. त्यावर सर्वोच्च न्यायालयात अपील गेले. सर्वोच्च न्यायालयाने सांगितले की बहिष्कृत करण्याचा अधिकार ही धर्माची "आवश्यक" बाब आहे. ह्यास आधार अर्थात त्या धर्माच्या लोकांनी दिलेल्या पुराव्याचा. तेव्हा एखाद्या व्यक्तीस बहिष्कृत करणे ही धर्माची आवश्यक बाब असल्याने त्यावर मर्यादा फक्त दोन कारणास्तव घालता येतात : (१) सामाजिक सुव्यवस्था, स्वास्थ्य आणि नीतिमत्ता व (२) सामाजिक कल्याण व सुधारणा.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वरील कायद्याचे समर्थन पहिल्या कारणास्तव करता येत नाही. वरील कायदा हा सामाजिक सुधारणेसाठी केला आहे असा युक्तिवाद करून वैध ठरवता आला असता. परंतु न्यायालयाच्या मते ही सामाजिक सुधारणा नसून धर्माबाबतची सुधारणा असल्याने वरील कायदा त्याच्या कक्षेत येत नाही.

हा निर्णय भारतीय संविधानाच्या इतिहासातील एक दुर्दैवी निर्णय आहे. ह्यात सर्वोच्च न्यायालयाने धर्माच्या आवश्यक बाबी कोणत्या ते ठरवण्याचा धर्मसंस्थाना संपूर्ण अधिकार दिला आणि त्यामुळे बहिष्कार घालणे ह्यासारख्या कालबाह्य चालीला घटनेचे संरक्षण मिळाले. दुसरे म्हणजे सर्वोच्च न्यायालयाने "सामाजिक सुधारणा" ह्या शब्दांना इतका संकुचित अन्वयार्थ दिला की त्यामुळे सामाजिक परिवर्तनाच्या प्रयत्नाना उगीचच खीळ बसली. वरील प्रकारचा कायदा जर अमेरिकेतील सर्वोच्च न्यायालयापुढे आला असता तर त्या न्यायालयानेही तो अवैधच ठरवला असता. पण भारतीय घटनेतील धर्म–राज्य ह्यांचे संबंध नियंत्रित करणाऱ्या तरतुदी अमेरिकी घटनेपेक्षा वेगळ्या आहेत आणि अमेरिकी जीवनात अशा प्रथेने होणारी हानी भारताच्या मानाने मर्यादित असल्याने तो निर्णय त्या संदर्भात योग्य झाला तरी भारतीय परिस्थितीच्या संदर्भात योग्य नाही.

गौड सारस्वत ब्राह्मणांनी स्थापन केलेल्या दाननिधीच्या देवालयात फक्त त्या जातीच्याच लोकांना प्रवेश मिळू शकत होता. मद्रास राज्याने कायदा करून सर्व हिंदू देवालये सर्व जातीच्या लोकांसाठी खुली केली. दाननिधीने ह्या कायद्यास आक्षेप घेतला. त्याचे म्हणणे असे की देवालयात कुणाला घ्यायचे हा धर्माबाबतचा अंतर्गत प्रश्न असल्याने त्याबाबत कलम २६ (ब) ने धार्मिक दाननिधींना संपूर्ण स्वायत्तता दिली आहे. शासनाचे म्हणणे असे की कलम २५ (२) (ब) ने सर्व हिंदू देवालये हिंदू धर्मीच्या सर्व लोकांना खुली करून देण्याचा अधिकार शासनास दिला आहे. सर्वोच्च न्यायालयाने ह्यावर भाष्य करताना सांगितले[१] की कलम २५ (२) (ब) व कलम २६ (ब) ह्यांचा अन्वयार्थ लावताना दोन्ही कलमांना न्याय मिळाला पाहिजे. ह्यावर तोड म्हणून न्यायालयाने असा निर्णय दिला की देवालयात सर्वांना प्रवेश देण्याचा अधिकार शासनाला आहे परंतु पूजेच्या बाबतीत व मूर्तीजवळ जाण्याबाबत दाननिधीने मानलेले नियम धर्माबाबतच्या अंतर्गत बाबी असल्याने त्यांनाही संरक्षण मिळाले पाहिजे. म्हणजे अशा ठिकाणी फक्त गौड सारस्वत ब्राह्मणांनाच जाता येईल.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कलम २५ व २६ ह्यामध्ये खरे पाहता अंतर्विरोधी असण्याचे काही कारण नाही. कलम २५ ने त्या व्यक्तीच्या धर्म-स्वातंत्र्याची हमी दिली आहे. पण ह्या स्वातंत्र्यावर मर्यादा घालण्याचा अधिकार शासनाला दिला आहे. कलम २६ ने धार्मिक दाननिधीना धर्म-स्वातंत्र्य दिले आहे. ह्या स्वातंत्र्याची व्याप्ती व्यक्तीच्या धर्म-स्वातंत्र्यांपेक्षा रुंद असण्याचे काही कारण नाही. त्यामुळे कलम २५ ने ज्या मर्यादा व्यक्तीच्या धर्म-स्वातंत्र्यावर घातल्या आहेत त्या सर्व धार्मिक दाननिधींच्या धर्म-स्वातंत्र्यावरही आहेत. कलम २६ मधली तरतूद हा केवळ कलम २५ चा तपशील आहे. कलम २६ ने दिलेले अधिकार जर कलम २५ ( २ ) मध्ये शासनाला दिलेल्या अधिकाराने सीमित झाले तर ह्या दोन कलमांमधील अंतर्विरोधाचा प्रश्नच येणार नाही. मग सरळ असे म्हणता येईल की दाननिधींचे अधिकार सर्व हिंदू देवालये सर्व जातीच्या लोकांना खुली करून देणे व सामाजिक कल्याण व सुधारणा ह्याकरता कायदे करणे ह्याने मर्यादित झाले आहेत. दाननिधीना देवालये विशिष्ट जातीच्या लोकांसाठीच खुली ठेवण्याचा अधिकारच नाही हे एकदा मान्य केल्यावर त्या अधिकाराची शासनाच्या सर्व देवालये खुली करण्याच्या अधिकाराशी सुसंगती जोडण्याचा प्रश्नच उरत नाही. कलम २६ मध्ये "subject to other Provisions of this Part" हे शब्द नाहीत. कलम २५ मध्ये वरील शब्द असल्याने धर्म-स्वातंत्र्यावर इतर मूलभूत अधिकारांचे बंधन पडते तसे कलम २६ वर पडत नाही.

## शासन व धर्म ह्यांचे संबंध

स्मिथने सेक्युलर स्टेटचे जे तीन गुण सांगितले आहेत त्यांच्या संदर्भात ही चर्चा होत आहे. वरील विवेचनावरून हे स्पष्ट होईल की पहिले दोन गुण भारतीय विधानाने जोपासले आहेत. सर्वांना समान वागणूक व व्यक्तीला धर्माबाबत स्वातंत्र्य हे ते गुण होत. ह्यापैकी व्यक्तीच्या धर्म-स्वातंत्र्यावर भारतीय संविधानाने अमेरिकी संविधानात आहेत त्यापेक्षा जास्त मर्यादा घातल्या आहेत. धार्मिक दाननिधींच्या कारभारावर शासन कडक नियंत्रण ठेवते. व्यक्तीच्या धर्म-स्वातंत्र्यावर सामाजिक कल्याण व सुधारणा ह्याकरता मर्यादा घालते तसेच धर्माशी निगडित असलेल्या 'सेक्युलर' बाबींचे नियंत्रण करते. ह्यातून आणखी एक गोष्ट स्पष्ट होते. ती म्हणजे भारतीय राज्यघटनेला, राज्य आणि धर्म ह्यात जी संपूर्ण फारकत अमेरिकेतील राज्यघटनेत आहे, तशी अभिप्रेत नाही. अमेरिकेत शासन व धर्म ह्यांची कार्यक्षेत्रे एकमेकापासून



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सर्वस्वी भिन्न आणि वेगळी आहेत. शासनाने कुठलाही धर्म स्थापन करता कामा नये असे अमेरिकेच्या राज्यघटनेतील पहिल्या दुरुस्तीचा हुकूम आहे. जेफररने ह्यावर भाष्य करताना धर्म व शासन ह्यात फारकत करणारी भिंत ( Wall of Separation ) उभी आहे असे सांगितले होते. सर्वोच्च न्यायालयाने ह्या तरतुदीचा अन्वयार्थ लावताना शासनाने कुठल्याही धर्माला प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे मदत करू नये असे सांगितले.[६] भारतीय राज्यघटनेला अशी भिंत अभिप्रेत नाही हे कलम २७, २८,२९ व ३० ह्या कलमांवरून दिसते.

कलम २७ म्हणते की शासनाने कुठल्याही व्यक्तीवर कुठल्याही विशिष्ट धर्मांच्या प्रगतीसाठी अगर संवर्धनासाठी लागणारा निधी गोळा करण्यासाठी कर देण्याची सक्ती करता कामा नये. ह्याचा अर्थ असा की कलम २७ प्रमाणे कुठल्याही विशिष्ट धर्मासाठी कर बसवता येत नाही. त्यात देखील रोख फक्त सक्तीवर आहे. (Compelled) कुठल्याही " विशिष्ट धर्मासाठी " ऐच्छिक कर असू शकेल. दुसरे म्हणजे कराची सक्ती कुठल्याही विशिष्ट धर्मासाठी होऊ नये. परंतु सर्व धर्मांना सारखी मदत करण्याकरता जर कर आकारला गेला तर तो आक्षेपार्ह ठरणार नाही. अशा कराची सक्तीही होऊ शकते. मद्रास राज्याने सर्व धार्मिक दान निधींच्या व्यवस्थापनाच्या खर्चाकरता कर आकारला होता व तो सर्वोच्च न्यायालयाने वैध ठरवला.[७] तसेच शासन सर्व धर्मांच्या लोकांना सवलती देते. उदा० हज्जच्या किंवा कुंभमेळ्याच्या यात्रेकरूंना प्रवासाच्या सोयी व तिकिटाच्या दरात सवलती मिळतात. मुंबईस भरलेल्या युकेरिस्टिक कॉन्फरन्ससाठी महाराष्ट्र सरकारने व केंद्र सरकारने अनेक सवलती दिल्या होत्या. ह्या सवलतीमुळे सरकारी तिजोरीत जेवढा भरणा व्हायचा तेवढा होत नाही. त्यामुळे हा एक धर्मांकरता कर बसवण्याचा अप्रत्यक्ष मार्ग आहे असा आक्षेप मुंबई हायकोर्टात घेण्यात आला. कलम २७ ने अशा तऱ्हेच्या सवलती अवैध होत नाहीत असा निर्णय न्या. तारकुंडे ह्यांनी दिला.[८]

नुकतेच दिल्ली उच्च न्यायालयात सुरेशचंद्र वि. भारत सरकार[९] ह्या खटल्यात न्या. देशपांडे ह्यांनी कलम २७ वर आणखी प्रकाश टाकला. ह्या खटल्यात भगवान महावीराच्या निर्वाणाची २५०० वी जयंती साजरी करण्याच्या भारत सरकारच्या निर्णयास आक्षेप घेण्यात आला होता. अर्जदारातर्फे असे निवेदन केले गेले की वरील निर्णय राज्यघटनेला अभिप्रेत असलेल्या धर्मातीततेच्या तत्वाशी विसंगत आहे. न्या. देशपांडे ह्यांनी कलम २७ चा अन्वयार्थ वर दिला आहे तसाच आहे असे स्पष्ट करून सांगितले की " सरकार सर्व धर्मांच्या व संस्कृतीच्या पुढाऱ्यांचा, मग ते कुठल्याही धर्माचे अगर जातीचे असोत,

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सत्कार करत आले आहे. म्हणजेच ते कुठल्याही एका विशिष्ट धर्माबाबत पक्षपात करत नाही. ''

शासन आणि धर्म ह्यांची संपूर्ण फारकत भारतीय राज्यघटनेला अभिप्रेत नसल्याचा आणखी एक पुरावा म्हणजे कलम २९० अ ह्यात केरळ सरकारने रु. ४६ लक्ष ५० हजार व तामीळनाडू सरकारने रु. १३ लक्ष ५० हजार दरवर्षी त्या त्या राज्यातल्या काही देवस्थानांच्या विनियोगासाठी द्यावेत असे सांगितले आहे. हे कलम म्हणजे कलम २७ चा अपवाद होय.

अमेरिकेत शासन आणि धर्म ह्यांची फारकत शैक्षणिक संस्थांसंबंधी स्पष्टपणे जाणवते. कुठल्याही धर्माशी संलग्न असलेल्या शैक्षणिक संस्थेस शासन अनुदान देत नाही आणि शासनाकडून अनुदान मिळणाऱ्या संस्थेस धर्माशी संबंध ठेवता येत नाही. अशा संस्थेस धर्माचे शिक्षणही देता येत नाही. भारतात सर्व शिक्षणसंस्थांना सरकारी अनुदान लागतेच. अनुदानाशिवाय फार थोड्या संस्था जगू शकतात. भारतीय राज्यघटना अल्पसंख्याकांना, ( धार्मिक व भाषिक दोन्ही ) आपल्या शिक्षणसंस्था स्थापण्याचा आणि त्या चालवण्याचा अधिकार देते. (कलम ३० (१) ) अशा शिक्षणसंस्थाविरुद्ध अनुदान देण्याबाबत पक्षपात होऊ नये अशी घटनेची ताकीद आहे. [ कलम ३० (२) ] अशा शिक्षणसंस्थातून धार्मिक शिक्षणही दिले जाते. अशा संस्थांना जर सरकारी अनुदान किंवा मान्यता नाकारायची झाली तर त्यांच्या शैक्षणिक संस्था स्थापन करण्याच्या अधिकाराला काही अर्थ उरणार नाही. ही भूमिका सर्वोच्च न्यायालयाने केरळ शैक्षणिक विधेयकावर राष्ट्रपतींना जे मत दिले त्यात मान्य केली आहे.[१०] सरकारी अनुदान मिळणाऱ्या संस्थांनी धर्माशी संबंध ठेवता कामा नये किंवा धार्मिक शिक्षण देता कामा नये असा जर नियम केला असता तर अल्पसंख्याकांच्या शैक्षणिक अधिकाराचा संकोच झाला असता. आणि जर हे तत्व अल्पसंख्य जमातींना लावायचे नाही तर बहुसंख्यांच्या संस्थाना तरी का लावायचे असा विचार करून घटनाकारांनी ते संपूर्णपणे नाकारले. कलम २८ मध्ये सरकारी शाळा ( म्हणजे ज्या सरकारच चालवते व स्थापन करते त्या) आणि सरकारमान्य व सरकारकडून अनुदान मिळवणाऱ्या शाळा ह्यात भेद केला आहे. सरकारी शैक्षणिक संस्थामधून धर्मविषयक शिक्षण देण्यात येता कामा नये. ( कलम २८ ( १ ) ) ह्याला अपवाद म्हणजे ज्या संस्था दाननिधी अगर विश्वस्तनिधी–मार्फत स्थापण्यात आल्या आहेत व ज्याप्रमाणे त्या संस्थात धार्मिक शिक्षण देण्याची अट घालण्यात आली आहे त्या संस्था जर शासन चालवत असेल तर त्यामध्ये

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

धार्मिक शिक्षण देता येईल. ज्या संस्था सरकारकडून अनुदान घेतात किंवा सरकारमान्य आहेत त्यामध्ये धार्मिक शिक्षण देता येते. मात्र अशा धार्मिक शिक्षणाची सक्ती कुठल्याही विद्यार्थ्यांवर होता कामा नये. असे शिक्षण फक्त त्या व्यक्तीच्या किंवा तिच्या पालकाच्या संमतीने दिले जावे ( कलम २८ (२) ). शासनाने धर्माशी संबंध असलेल्या शिक्षणसंस्थेला अनुदान देऊ नये किंवा अनुदान घेणाऱ्या संस्थांचा धर्माशी संबंध असता कामा नये हा नियम भारतीय राज्यघटनेला अभिप्रेत नाही.

भारतीय संविधानाला धर्मनिरपेक्ष आणि सर्व धर्मांना समान वागणूक देणारे शासन अभिप्रेत आहे. शासनाचा स्वतःचा असा कुठलाच धर्म नाही. परंतु ज्या देशात एकाच धर्माच्या लोकांचे प्रमाण जवळ जवळ ऐंशी टक्के आहे ( हिंदू ) तेथे शासनाने सर्व धर्मांना समान वागणूक द्यायचे ठरवल्यासही त्याची कार्यवाही करताना हिंदू धर्माला झुकते माप मिळण्याची शक्यता आहे. त्यामुळे शासनाने सर्व धर्मांना सारखी वागणूक द्यावी परंतु कुठल्याही धर्माचा ठसा शासनावर पडणार नाही ह्याची काळजी घ्यावी. महाराष्ट्राच्या मुख्यमंत्र्यानी पंढरीच्या विठोबाची सार्वजनिक पूजा करण्याबाबत जो वाद झाला तो ह्या संदर्भात महत्त्वाचा आहे. मुख्यमंत्री जर शासनाचा प्रतिनिधी या नात्याने त्या समारंभाला गेले तर ते सेक्युलर स्टेटच्या तत्त्वाशी विसंगत होईल. अर्थात मुख्यमंत्री जर फक्त व्यक्तिगत भूमिकेवरूनच अशा समारंभाचे पौरोहित्य करणार असतील तर मात्र त्याला कुणाची हरकत नसावी. कारण व्यक्ती म्हणून इतर व्यक्तींप्रमाणेच त्यानाही धर्म-स्वातंत्र्याचा अधिकार आहे.



संदर्भ —

१. केशवानंद भारती वि. केरल राज्य, ऑल इंडिया रिपोर्टर १९७३ सुप्रीम कोर्ट पान १४५१. ह्या खटल्याची सविस्तर चर्चा प्रस्तुत लेखकाने समाज प्रबोधन पत्रिकेच्या अंकात केली आहे. पहा " न्यायालयीन पुनरवलोकन : केशवानंद भारती निर्णयाच्या निमित्ताने " समाज प्रबोधन पत्रिका, ६०, नोव्हेंबर-डिसेंबर १९७४ पान १-१२.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

२. डी. ओ. स्मिथ, "इंडिया अॅज ए सेक्युलर स्टेट" पान ३. ( प्रिन्स्टन युनिव्हर्सिटी प्रेस, न्यू जर्सी, १९७३.

३. पी. के. त्रिपाठी "सेक्युलॅरिझम : कॉन्स्टिटचूशनल प्रोव्हिजन अँड ज्युडिशियल रिव्हयू" जर्नल ऑफ दि इंडियन लॉ इस्टिटचूट, पान १ (१९६६).

४. सैफुद्दिन साहेब वि. मुंबई राज्य, ऑल इंडिया रिपोर्टर १९६२ सु. को. पान ८५३.

५. व्यंकटराम देवस वि. म्हैसूर राज्य, ऑल इंडिया रिपोर्टर १९५८ सुप्रीम कोर्ट पान २५५.

६. अेव्हरसन वि. बोर्ड ऑफ अेज्युकेशन, ३३० यू. एस. पान १ (१४७)

७. कमिशनर, हिंदू रिलिजस एनडालमेंट्स्, मद्रास वि. लक्ष्मींद्र स्वामियार ऑल इंडिया रिपोर्टर १९५४ सु. को. २८२.

८. ह्या खटल्याची चर्चा प्रस्तुत लेखकाच्या "सेक्युलॅरिझम अॅड लॉ" ह्या लेखात केली आहे. पहा व्ही. के. सिन्हा ( संपादक ) सेक्युलॅरिझम इन इंडिया, पान. ११३ ( लालवाणी १९६८ )

९. ऑल इंडिया रिपोर्टर १९७५ दिल्ली पान.

१०. इन दी केरल अॅज्युकेशन बिल, ऑलइंडिया रिपोर्टर १९५८ सु. को. पान ९५६.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. वि. भि. कोलते

# 'ज्ञानदेवांची जातिकुळावेगळी वंशावळी'च्या निमित्ताने

सुप्रसिद्ध विचारवंत व धर्मशास्त्रज्ञ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी 'नवभारत' मासिकाच्या ज्ञानेश्वर-विशेषांकात ( नोव्हेंबर–डिसेंबर– १९७५) 'ज्ञानदेवांची जातिकुळावेगळी वंशावळी' या शीर्षकाखाली एक अतिशय विचार-परिप्लुत लेख लिहिला आहे. हा लेख लिहिताना त्यांनी प्रामुख्याने 'संत नामदेवांच्या 'आदि' अभंगांची चर्चा केलेली आहे. ही चर्चा उद्‌बोधक आहे, यात शंका नाही. पण काही बाबतीत ती अपूर्ण आहे असे मला वाटते. या अपूर्ण भागाकडे लक्ष वेधण्यासाठीच हा लहानसा लेख लिहीत आहे.

तर्कतीर्थांच्या लेखाचे दोन विभाग पाडता येतील. एक, नामदेवांच्या 'आदि' अभंगांच्या आधारे ज्ञानदेवांची जातिकुळावेगळी वंशावळी दाखवून त्यांच्या अवैदिकत्वावर प्रकाश टाकणे व दुसरा, या अभंगात नमूद केलेल्या आळंदीच्या व पैठणच्या पंडितांनी ज्ञानेश्वरादि भावंडांच्या शुद्धीकरणासंबंधी दिलेल्या निर्णयाची चर्चा करणे. या चर्चेचा मूलाधार असलेले ज्ञानेश्वरांच्या आदीचे प्रकरण ( त्यातील विवेचन या भावंडांच्या जातिकुळीच्या श्रेष्ठत्वाला पोषक ठरणारे नसल्यामुळे ) प्रक्षिप्त असले पाहिजे असे म्हणून काही विद्वान ते निकालात काढतात. यावर तर्कतीर्थांचे म्हणणे आहे की, " वारकरीपंथामध्ये आदीचे पठनपाठन हे संप्रदायाच्या दीक्षेप्रमाणे आवश्यक मानले जाते. हे चरित्र सत्य असो वा कल्पित असो, संत नामदेवांनी लिहिलेले असो अथवा मागाहून गाथेत प्रक्षिप्त केलेले असो, त्यातून निघणारा भावार्थ मात्र भागवतधर्माच्या मूळ विश्वव्यापी सामाजिक प्रेरणेशी अत्यंत सुसंगत आहे. " शिवाय, महत्वाची गोष्ट अशी की, निवृत्तिज्ञानेश्वरादिकांच्या पूर्वचरित्राचे आणि वंशाचे वर्णन

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

करणारा तो एकमेव आधार आहे. त्यामुळे तो विचारात घेतल्यावाचून गत्यंतर नाही. या 'आदि' प्रकरणातून निघणारा निष्कर्ष शास्त्रीबुवा पुढील शब्दात मांडतात. "अत्यंत जरठ व संकुचित अशा श्रुतिस्मृतिप्रोक्त वर्णाश्रमधर्माला बाजूला सारणारा व सर्व मानवांना परमार्थाचा अधिकार उच्चनीचभेदभाव न करता समर्पण करणारा जो महाराष्ट्रातील भागवतधर्म, त्याचा महान उपदेशक ज्ञानदेव हा श्रुतिस्मृत्युक्त संस्कार न झालेला आणि अशा संस्कारांची गरज नसलेल्या एका मोठ्या अवैदिक परंपरेचा सिद्ध पुरुष होता, असा या आदि अभंगातील चरित्रकथेचा निष्कर्ष आहे व हा निष्कर्ष सर्वमान्य होण्यासारखा आहे. श्रौत व स्मार्त धर्म किंवा वर्णाश्रमधर्म यांच्या मर्यादेच्या बाहेर गेल्याशिवाय भागवतधर्माची पताका उभारली जाऊन विजयी होऊ शकली नाही, हे रहस्य या चरित्रकथेने सूचित होते."

आपल्या लेखाच्या उत्तरार्धात तर्कतीर्थांनी, 'आदीं'च्या अभंगात नमूद केलेल्या आळंदी येथील ब्रह्मसभेने विठ्ठलपंतांना सांगितलेल्या देहान्त प्रायश्चित्ताच्या निर्णयाची चर्चा केली आहे. या संबंधात त्यांनी 'ज्ञानेश्वर-दर्शन' भाग १, (पृ. २०–३९) या ग्रंथात म. म. श्रीधरशास्त्री पाठक यांनी लिहिलेल्या "श्री ज्ञानेश्वरांची पितृतः शुद्धि व धर्मशास्त्र' या लेखाकडे अभ्यासकांचे लक्ष वेधले आहे. "श्री. पाठकशास्त्री यांच्या मते 'आदि अभंगा'तील आळंदीच्या ब्रह्मसभेचा हा देहान्त प्रायश्चित्ताचा निर्णयच अशास्त्रीय आहे, असे याज्ञवल्क्यस्मृतीवरील 'सुप्रसिद्ध मिताक्षर निबंध', माधवाचार्यांची पराशरस्मृतीवरील टीका, कमलाकरभट्टाचा 'निर्णयसिंधू', नागेशभट्टाचा 'प्रायश्चित्तेंदुशेखर' आणि काशिनाथोपाध्याय यांचा 'धर्मसिंधु' या सर्वांचे विवेचन पाहता म्हणता येते. संन्यासातून गृहस्थाश्रमात परतणे म्हणजे प्रत्यावृत्ती ही पातित्यास कारण होत नाही; ते उपपातक नाही; महापातक नाही; आणि या उपपातकाचे प्रायश्चित्तही सहा महिने आचरावयाची "चांद्रायणादी' व्रते होत... देहान्त प्रायश्चित्त हे केवळ महापातकासच धर्मशास्त्राने ठरविलेले आहे. देहान्त प्रायश्चित्ताचा एक अर्थ देह असेपर्यंत तपाचरण करणे असा आहे. देह असेपर्यंत पतिताने तप करीत राहायचे व आपल्या जातीतून आपण बहिष्कृत आहोत असे समजून वागायचे. महापातकांची प्रायश्चित्ताने शुद्धी झाली तरी सव्यवहार्यता म्हणजे स्वजातीत व्यवहार करण्यास पात्रता येत नाही, तसे हे पातक नाही; म्हणून म. म. पाठकशास्त्री यांच्या मते विठ्ठलपंतांना सांगितलेले देहान्तप्रायश्चित्त हे धर्मशास्त्रविरुद्ध होय," म. म. पाठकशास्त्री यांच्या विवेचनाचे असे सार सांगून तर्कतीर्थ म्हणतात की, "पाठकशास्त्री यांनी हा जो

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निष्कर्ष वरील धर्मशास्त्रग्रंथावरून काढला तो बरोबर आहे." पण तर्कतीर्थांच्या मते आळंदीच्या ब्रह्मसभेने आपला निर्णय 'ब्रह्मसूत्रशांकरभाष्या'च्या आधारे दिलेला असावा. अर्थात, तो निर्णय बरोबर आहे. कारण, "ब्रह्मसूत्रशांकर-भाष्यात संन्याशाला प्रत्यवरोहण म्हणजे संन्यासातून पुन्हा गृहस्थाश्रमात परतणे हे पतनकारक होय... म्हणजे प्रायश्चित्त घेतल्यानंतरही त्यावरचा बहिष्कार उठू शकत नाही." मिताक्षरा आणि ब्रह्मसूत्रशांकरभाष्य या दोन्ही ग्रंथातील विवेचन लक्षात घेऊन तर्कतीर्थांनी त्यांचा समन्वय पुढीलप्रमाणे केला आहे. ते म्हणतात : "संन्यासाश्रमातून गृहस्थाश्रमात परत फिरण्यासंबंधी महाराष्ट्रात व भारतात दोन विरुद्ध परंपरा प्राचीन काळी मान्यता पावलेल्या दिसतात. एक मध्यम मार्गी मिताक्षरादी धर्मनिबंधोक्त; म्हणजे अल्प प्रायश्चित्तपूर्वक प्रत्यवरोहणास मान्यता देणारी व दुसरी आत्यंतिक क्षुरधारामार्गी शांकरभाष्योक्त; म्हणजे प्रत्यवरोहणास देहान्तप्रायश्चित्त सांगून अमान्यता सांगणारी."

या दोन्ही दृष्टींनी ज्ञानदेवांच्या जातिकुळीचा विचार व्हावयास पाहिजे. तो विठ्ठलपंतांच्या जीवनातील घटनांचा अनुक्रमाने विचार करण्याऐवजी व्युत्क्र-माने केल्यास अधिक बरे होईल असे मला वाटते. आळंदी व पैठण या दोन्ही क्षेत्रातील ब्रह्मवृंदांनी निवृत्तिज्ञानेश्वरादी भावंडांना उपनयनाचा अधिकार नाका-रला, ही शेवटची घटना निश्चित आहे. त्याचमुळे तर्कतीर्थांनी म्हटले आहे की, 'महाराष्ट्राच्या भागवतधर्माला तत्वज्ञानाचे विशाल अधिष्ठान देणारे ज्ञानदेव ह्यांना ब्राह्मणी संप्रदायाने द्विजत्वाच्या संस्कारास अपात्र म्हणजे शूद्र ठरविले; वैदिक धर्मशास्त्राप्रमाणे वास्तविक रीत्या ज्ञानदेव हे निवृत्ति, सोपान, मुक्ता-बाईसह अतिशूद्रच ठरले; अर्थात् वारकरी संप्रदायाचा मूलाधार अतिशूद्र होय, हे ठरले." हे शूद्रत्व किंवा अतिशूद्रत्व येण्यास मुख्य कारण या भावंडांच्या उपनयन संस्काराला ब्रह्मवृंदांनी दिलेला नकार. तर्कतीर्थांनी वर्णन केलेल्या शांकरभाष्योक्त क्षुरधारामार्गी परंपरेने पाहता हा नकार सयुक्तिक दिसतो. कारण, विठ्ठलपंत आरूढपतित असल्यामुळे त्यांना देहांत प्रायश्चित्त या परंपरेच्या धर्मशास्त्राला धरूनच आहे. विशेष हे की या परंपरेनुसार प्रायश्चित्त घेतल्या-वरही त्यावरचा बहिष्कार उठू शकत नाही. म्हणजे विठ्ठलपंतांनी देहांत प्रायश्चित्त घेतल्यानंतरही त्यांच्यावरचा, म्हणजेच त्यांच्या वंशावरचाही बहिष्कार चालूच होता. अर्थात, निवृत्तिज्ञानदेवावरही हा बहिष्कार चालूच असल्यामुळे त्यांना उपनयनाचा, आणि त्याद्वारे प्राप्त होणारा द्विजत्वाचा अधिकार नाकारला जाणे योग्य ठरते.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पण म. म. श्रीधरशास्त्री यांनी वर्णन केलेल्या पहिल्या परंपरेनुसार हा अधिकार नाकारला जाणे योग्य नव्हते, कारण, त्या परंपरेनुसार विठ्ठलपंतांचे आरूढपतितत्वाचे पातक हे महापातक नसून उपपातक होते, व चांद्रायणादी व्रते काही काळ आचरून त्याची निष्कृति होणे या परंपरेच्या धर्मशास्त्रानुसार सहज शक्य होते. आणि तरीही आळंदी येथील ब्रम्हवृंदांनी त्यांना देहांत प्रायश्चित सांगितले. इतकेच नाही तर त्यांनी व पैठण येथील ब्राम्हणांनीही त्यांच्या संततीला, म्हणजे निवृत्तिज्ञानदेवादिकांना उपनयनाचा अधिकार नाकारला. त्यांचा तो निर्णय धर्मशास्त्राच्या विरुद्ध होता म्हणून चुकीचा होता असे पाठकशास्त्री स्पष्ट म्हणतात. ते लिहितात, " ब्राह्मणांनी प्रायश्चित्त सांगितल्यावरून विठ्ठलपंतांनी ते न केल्यामुळे जो काही दोष त्यांच्या ठिकाणी राहिला असेल तेवढ्याने त्यांची संतति पतित ठरत नाही. ती संतति सजातीय –विवाहित–ब्राह्मणसंतति होती; व म्हणून उपनयनाची पूर्ण अधिकारी होती. " (ज्ञानेश्वर दर्शन भाग. १.पृ. ३४). यातील 'विठ्ठलपंतांनी ब्राम्हणांनी सांगितलेले प्रायश्चित्त केले नाही ' हे पाठकशास्त्र्यांचे विधान बरोबर नाही. विठ्ठलपंतांनी प्रायश्चित्त केले होते असे 'आदि' अभंगात स्पष्ट म्हटले आहे. 'श्रीपाद म्हणती अवश्य करीन। देह हे दंडीन अनुतापे ॥ त्रिवेणी संगमी घालीन कर्वती' या शब्दात आळंदीच्या ब्राम्हणानी दिलेले देहांत प्रायश्चित्त मान्य करून विठ्ठलपंत 'गेला पूर्वस्थिती वीतरागे ॥ दारा पुत्र गृह त्यजूनी निघाला' आणि अशा रीतीने 'झाला शुचिर्भूत गुरुकृपे' ( श्रीज्ञानेश्वरांची आदि. अभंग क्र. ९५७ श्रीनामदेवगाथा. चित्रशाळा प्रत ). अशा रीतीने विठ्ठलपंतांनी प्रायश्चित्त केल्यावर तर त्यांच्या संततीवरील बहिष्कार उठवून त्यांना उपनयनाचा अधिकार द्यायला पाहिजे होता. पण तसे घडले नाही हे खरे. तेव्हा श्रीधरशास्त्री पाठक म्हणतात त्याप्रमाणे आळंदी व पैठण येथील ब्रह्मवृंदांचा हाही निर्णय चुकीचा होता, की या निर्णयाचे कारण दुसरे काही असावे ?

मला वाटते की या बाबतीत विचाराला चालना देणारे असे काही उल्लेख 'आदि' अभंगात आहेत. त्यांच्याकडे अनेकांचे दुर्लक्ष झालेले दिसते. किंवा ते उल्लेख समोर असूनही त्यातील मथितार्थाचा नीट विचार झाला नसावा. याही बाबतीत आपण व्युत्क्रमपद्धतीनेच जाऊ या. आळंदी येथील ब्रम्हवृंदाने उपनयनाच्या अधिकारासाठी पैठणच्या ब्राम्हणांकडून पत्र आणण्यास सांगितले. त्याप्रमाणे निवृत्तिज्ञानदेवादी भावंडे पैठणला जाण्याला निघाली. आळंदीच्या ब्राम्हणांनी त्यांच्याबरोबर आपलेही पत्र दिले. ते घेऊन ही भावंडे पैठणला


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पोचली. तेथील ब्रम्हवृंदांसमोर त्यांनी आपले प्रकरण 'होते तैसे स्पष्ट निवेदिले' आणि आळंदीच्या ब्रम्हवृंदाचे पत्र सादर केले. तेव्हा –

> पत्र वाचूनिया सकळां जाले श्रुत । संन्याशाचे पुत्र कळो आले ॥
> नाही प्रायश्चित्त उभयता कुळभ्रष्ट । बोलियेले श्रेष्ठ पूर्वापार ॥ (९६१)

– पत्र वाचून त्यांच्या लक्षात आले की ही संन्याशाची मुले तर आहेतच, पण ती 'उभयता कुलभ्रष्ट' आहेत. म्हणून त्यांना प्रायश्चित्त नाही. अर्थात्, त्यांच्या बाबतीत उपनयनाच्या अधिकाराचा प्रश्नच निर्माण होत नाही.

'आदि' अभंगात निवृत्तिज्ञानेश्वरादिकांना 'उभयता कुलभ्रष्ट' म्हटले आहे, ते कोणत्या अर्थाने असावे ? श्रीधरशास्त्री पाठकांच्या समोर हे चरण होते. तो संपूर्ण अभंगच त्यांनी आपल्या लेखात उद्धृत केला आहे, पण त्याचा भावार्थ सांगताना 'उभयता कुलभ्रष्ट' या शब्दांचा विचार त्यांच्या अवधानातून सुटला. तो केल्यास आळंदीच्या व पैठणच्या ब्राह्मणांचा निर्णय चुकीचा होता की बरोबर होता या प्रश्नातील गुंता सोडविण्यास मदत होईल असे वाटते. 'उभयता कुलभ्रष्ट' या शब्दातील 'उभयता' म्हणजे विठ्ठलपंत व रखुमाई असतील काय ? 'कुलभ्रष्ट' हा शब्द तर उघडउघड निवृत्ति ज्ञानेश्वरादि भावंडांसाठी वापरलेला दिसतो. तेव्हा ही भावंडे उभयकुलाकडून, म्हणजे पितृकुल व मातृकुल या दोन्ही कुलांकडून भ्रष्ट आहेत, असा याचा अर्थ असावा काय ? किंवा, ही संन्याशाची मुले असल्यामुळे ती आता पितृकुलातून व मातृकुलातून 'भ्रष्ट' झाली आहेत, म्हणजे त्यांना आता पितृकुलही राहिले नाही, आणि मातृकुलही राहिले नाही, या दोहोपासून ती वेगळी झाली आहेत, अर्थात्, त्यांना आता कोणतेही कुळ राहिले नाही (आणि म्हणून प्रायश्चित्ताचा प्रश्नच उद्‌भवत नाही) असा त्याचा अर्थ असू शकेल ? यापैकी कोणता अर्थ अभिप्रेत असेल याचा विचार धर्मशास्त्रज्ञांनी करावा. हे दोन शब्द 'आदि' अभंगातील आहेत, ते महत्त्वाचे आहेत, आणि त्यातून निष्पन्न होणारा अर्थ विचारास घेणे अवश्य आहे, एवढे मात्र खरे.

पैठणच्या ब्राह्मणांनी या भावंडांना 'उभयता कुलभ्रष्ट' कशावरून म्हटले ? अर्थात, त्यांच्या समोर आळंदीच्या ब्राह्मणांचे पत्र होते, त्यावरून आळंदीच्या ब्राह्मणांना विठ्ठलपंत आणि रखुमाई यांचा सर्व वृत्तांत माहित असेल व तोच त्यांनी पत्रात लिहून कळवला असावा. हा कुलवृत्तांत काय असेल ? यावर प्रकाश पडेल असे 'आदि' अभंगात काही आहे काय ? मला वाटते की या संबंधात 'आदि' अभंगातील अभंगांचा काही उपयोग होईल काय ते पाहावे.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

या अभंगाची पार्श्वभूमी अशी. आळंदीच्या ब्राह्मणांनी या भावंडांना पैठणला जाण्याला सांगितल्यानंतर ती निघाली. त्यांच्यात झालेला विचारविनिमय ९५८ ते ९६० या अभंगात आला आहे. निवृत्तीचे म्हणणे असे होते की आपण "नाही जाति कुळ वर्ण अधिकार। क्षेत्री वैश्य शूद्र द्विज नव्हे ॥ नव्हो देवगण यक्ष ना किन्नर। ऋषि निशाचर तेही नव्हे" ते आम्ही अविनाश अव्यक्त जुनाट। निजबोधे इष्ट स्वरूप माझे" त्यामुळे मला, अर्थात आपणाला प्रायश्चित्ताची गरजच नाही. हे सर्व बोलणे भावार्थाने घ्यायचे की वाच्यार्थाने ? काही असले तरी 'जाति कुळावेगळी पडियेली निराळी। माझी वंशावळी' हे जसे विठ्ठलपंतांनी म्हटले, तोच विचार 'नाही जाति कुळ वर्ण अधिकार'– या निवृत्तीच्या वचनात आहे यात शंका नाही. निवृत्तीचे हे म्हणणे खरे असले तरी आपणाला प्रायश्चित्ताची गरज काय ? हे त्याचे म्हणणे ज्ञानदेवाला मान्य नव्हते. "स्वधर्म अधिकार जातिपरत्वे भेद। उचित ते शुद्ध ज्याचे तया ॥ म्हणोनिया संती अवश्य आचरावे। जना दाखवावे वर्त्तोनिया ॥ कुळीचा कुळधर्म अवश्य पाळावा। सर्वथा न करावा अनाचार ॥" म्हणून ब्रह्मवृंद सांगेल ते प्रायश्चित्त आपण केले पाहिजे. यानंतर सोपानदेव काय म्हणाले ? ते पुढील अभंगात आले आहे. हा अभंग असा :

> हेचि आम्हां श्रेष्ठ बोलिले परमनिष्ठ। असतां दुर्घट परि सेव्य ॥
> पांडवाचे कुळ शोधिता निर्मुळ। कुंडजार गोळ बुद्धिकासी ॥
> भक्ति हे तरती जाती न सरती। ऐसी आत्मस्थिती स्वसंवेद्य ॥
> दुर्वास वसिष्ठ अगस्ति गौतम। हे ऋषि उत्तम कुळीचे कैसे ॥
> व्यास आणि वाल्मिकी कोण कुळ तयाचे। तैसेचि आमुचे सोपान म्हणे ॥
> (९६०)

निवृत्तिनाथांच्या बोलण्यापेक्षा सोपानदेवांचे हे बोलणे स्पष्ट आहे. त्याचा विचार करणे इष्ट होईल. पांडव, दुर्वास, वसिष्ठ, अगस्ति, गौतम, व्यास आणि वाल्मिक यांच्या कुळाप्रमाणेच आमचे कुळ आहे. दुर्वास, वसिष्ठ इत्यादी ऋषी हे 'उत्तम कुळीचे कैसे ?' असा प्रश्न विचारून सोपानदेव सुचवितात की ते (लौकिक दृष्टीने) हीन कुळातील होते. तसेच आम्ही हीन कुळातील आहोत, असे त्यांना सुचवायचे आहे काय ? पांडवांचे कुळ सुचवितांना तर 'कुंड जार गोळ बुद्धिकासी' हे शब्द सोपानदेवांनी वापरलेले आहेत. त्यांचा अर्थ लक्ष्यात घेतला पाहिजे. हा चरण 'कुंड जार गोळकासि बुद्धि' असा असावासे वाटते. कारण 'कुंड जार' या शब्दाच्या अनुषंगाने विचार केला असता त्यापुढील

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शब्द 'गोळक' असला पाहिजे असे दिसते. 'अमृते जारजः कुण्डो मृते भर्तरि गोलकः' म्हणजे स्त्रीला, नवरा जिवंत असतांना जारापासून झालेला मुलगा म्हणजे 'कुण्ड', आणि नवरा मेल्यानंतर विधवा स्त्रीला झालेला मुलगा तो 'गोलक' – असा अर्थ अमरकोशात दिलेला आहे. ( २–६–३६ ). मराठीत 'गोलक' म्हणजे अनौरस संतती असा सर्वसामान्य अर्थ आला असून 'गोलका'चे दोन प्रकार मानण्यात येतात. एक कुंडगोलक आणि दुसरा रंडगोलक. कुंडगोलक म्हणजे नवरा जिवंत असताना झालेली अनौरस संतती आणि रंड गोलक म्हणजे विधवेची अनौरस संतती. हे शब्द विशेषेकरून ब्राह्मण स्त्रीच्या अनौरस संततीला उद्देशून वापरले जातात. सोपानदेवांच्या या अभंगात पांडवांच्या कुंड ( जार ) गोळकत्वाचा उल्लेख केलेला आहे. दुर्वास वसिष्ठ इत्यादी ऋषींचे कुळ मुद्दाम शोधत बसण्याची आवश्यकता नाही. सर्व प्रकार वरील शब्दात सूचित झालेलाच आहे.

सोपानदेवांनी हा अभंग केवळ लाक्षणिक अर्थाने म्हटला असेल की वाच्यार्थाने ? संत हे जातिकुळापलीकडे असतात, त्यांचे जातिकुळ पाहाण्याची गरज नाही एवढ्याच भावार्थाने त्यांनी हे सर्व म्हटले असे मानावे तर 'व्यास आणि वाल्मिकी कोण कुळ तयाचे । तैसेचि आमुचे सोपान म्हणे' असे त्यांनी अनेक उदाहरणे देऊन आपले कुळ असल्याचे स्पष्टपणे सांगितले आहे, तिकडे दुर्लक्ष करून कसे चालेल ? त्यांनी या अभंगात आपली जी कुळकथा सांगितली आहे ती खरी असेल तर पुढे पैठणच्या ब्राह्मणांनी, आळंदीच्या ब्राह्मणांच्या पत्रातील वृत्तांत वाचून 'उभयता कुलभ्रष्ट' असे जे म्हटले त्याची संगती लावणे शक्य होईल. म. म. श्रीधरशास्त्री पाठक आणि तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी या दोन्ही धर्मशास्त्रपंडितांच्या लेखात 'आदि' अभंगातील ज्या काही गोष्टीकडे अनवधानाने का होईना, पण दुर्लक्ष झाले असावेसे मला वाटले त्या गोष्टीकडे अभ्यासकांचे लक्ष वेधावे एवढाच या लेखाचा हेतू आहे.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. शरद पाटील

# ब्रह्मन् : ८ : (पूर्वार्ध)

---

ब्राह्मण पुरोहितवर्ग, जो वैदिक व वैदिकोत्तर समाजांचा सर्वोच्च वर्ण म्हणून विकसित झाला, तो संस्था म्हणून आर्यांच्या काळात उगम पावला असे मानले जाते. ज्याप्रमाणे त्वष्ट्रचा पुत्र वृत्र हा देवांचा व असुरांचा पहिला ब्रह्मन् ऋत्विज् होता (विश्वरूपो वै त्वाष्ट्रः पुरोहितो देवानाम् आसीत् स्वस्त्रीयोऽसुराणाम् ।), त्याप्रमाणे वसिष्ठ हा मर्त्यांचा पहिला ब्रह्मन् पुरोहित होता. तैत्तिरीय संहिता (३.५.२) म्हणते–

'ऋषी इंद्राला साक्षात पाठवू शकत नव्हते. वसिष्ठाने त्याला प्रत्यक्ष पाहिले. तो (इंद्र त्याला) म्हणाला, 'मी तुला ब्रह्मसंत्र सांगतो, ज्यामुळे तुझ्या पौरोहित्याखाली प्रजा वृद्धिंगत होईल; म्हणून तू इतर ऋषींसमोर माझी उद्घोषणा कर.' त्याला त्याने हे स्तोमभाग सांगितले; म्हणून वसिष्ठालाच ब्रह्मन् पुरोहित म्हणून नियुक्त केले पाहिजे...'[१]

या पुरोहितपदाची उत्पत्ती आर्यपूर्व काळात झाली असे कोसंबी सिद्ध करतात–

'दहा राजांवरील विजयाचे गान करणाऱ्या पुरोहिताचे गोत्रनाम वसिष्ठ (सर्वोत्कृष्ट) आहे, जे अजूनही सात मुख्य पारंपारिक ब्राह्मण प्रवरांपैकी एक आहे. मूळ पुरोहित कुशिक (घुबड) गोत्राचा विश्वामित्र होता. ऋग्वेदात पौरोहित्यकर्माची अजून एक विशिष्ट जातीत परिणती झालेली नव्हती,... वसिष्ठ हा मात्र एक नव्या प्रकारचा पुरोहित होता. तो मित्र व वरुण या एकेकाळच्या अनुक्रमे सूर्य व द्यौ या देवतांच्या बीजापासून झाला होता. त्याच्या आईचा नामनिर्देश नाही. उलटपक्षी त्याच वृत्तांतात तो 'उर्वशीच्या (एक अप्सरा वा जलदेवता) मनापासून जन्मल्याचे,' तसेच या दोन देवांचे वीर्य-ग्रहण केलेल्या कुंभात जन्मल्यानंतर तो एका पुष्करात 'विद्युल्लता परिधान केलेल्या अवस्थेत सापडल्याचेही' सांगितलेले आहे. हा वरकरणी विसंगत

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वाटणारा वृत्तांत वस्तुतः अगदी सुसंगत व सरळ आहे. याचा अर्थ होतो की, वसिष्ठ एक आर्यपूर्व मातृदेवतेच्या मानवी प्रतिनिधीपासून झाला व म्हणून त्याला पिता नव्हता. पितृसत्ताक आर्यांकडे पक्षांतर करायचे, तर कोणतेतरी प्रतिष्ठित पितृत्व स्वीकारणे व अनार्य मातृत्व नाकारणे आवश्यक होते. अगस्त्य, अजून अस्तित्वात असलेल्या दुसऱ्या ब्राह्मण प्रवराचा प्रवर्तक, अशाच प्रकारे कुंभापासून जन्मला होता. कुंभ गर्भाशयाचा द्योतक आहे व म्हणून मातृदेवतेचा. या सात मुख्य ब्राह्मण गोत्रांच्या प्रवर्तकांची सप्तर्षी म्हणून कुळकथा प्राचीन सुमेरी वा सिंधु काळाइतकी मागे जाऊ शकते. ब्राह्मण धर्मग्रंथांनी दिलेल्या वेगवेगळ्या नामावलींमध्ये त्यांच्या नावांचा ताळमेळ बसत नाही. विश्वामित्र हा आठवा आहे, पण त्यांच्यातला तोच तेवढा अस्सल आर्य आहे. अशा 'कुंभोत्पन्न' ऋषींचा उच्च आर्य पुरोहितवर्गात समावेश हा मूलतः नवा उपक्रम होता. आर्य व एतद्देशीयांच्या या अशा पुनर्घटनेतून विशेषज्ञांचा एक नवा वर्ग विकसित झाला, जो अंतिमतः ब्राह्मण वर्ण म्हणून आर्यांच्या सर्व कर्मकांडावर मिरासदारीचा दावा करणार होता...'[२]

आद्यतम राज्याभिषेक कसा साजरा झाला, याची हकीगत ऐतरेय ब्राह्मण आपल्याला सांगते, जो त्यानंतर राज्याभिषेकांचा आदर्श नमुना बनला. त्यात वसिष्ठाने ब्रह्मन् ऋत्विज् म्हणून, विश्वामित्राने होतृ ऋत्विज् म्हणून, जमदग्नीने अध्वर्यु ऋत्विज् म्हणून व यास्याने उद्गातृ ऋत्विज म्हणून कामे केली. ( ७.१६ ). यावरून दिसते की, होतृसारख्या पुरोहितपदांचे जनकत्व आर्यांकडे होते, तर किमानपक्षी ब्रह्मन्चे अनार्यांकडे.

पण आपण हे अगोदरच पाहिले आहे की स्त्रीराज्यात राजपदाबरोबर पुरोहितपदही स्त्रीकडे होते. मग ब्रह्मन्चे मूळ कार्य कोणते होते? निघण्टु आपल्याला सांगतो की ब्रह्मन्चे अर्थ अन्न ( २.७.२५ ) व धन ( २.१०.२४ ) असे होत असत. ब्रह्मन्चा अर्थ मायामंत्र असाही होत असे, ज्यातून, २.२३ हे प्रसिद्ध ऋग्वेदीय सूक्त दिग्दर्शित करते त्याप्रमाणे, गण हा अन्न व धन मिळवू पाही. पण ब्रह्मन्चे असे अर्थ पुरोहितपद स्त्रीकडून काढून घेण्यात पुरुष यशस्वी झाल्यानंतर होऊ लागले. मूळ अर्थापर्यंत पोहोचण्याकरता आपल्याला अब्राह्मणी स्रोतांकडे वळले पाहिजे.

दीघनिकायमध्ये बुद्धाने अम्बट्ठ ब्राह्मणाला शाक्य गणाच्या उत्पत्तीबद्दल सांगितलेली एक कथा आहे. शाक्य गणाच्या चार मूळ पुरुषांचा पिता राजा ओक्काक याला त्याची दासी दिसा इच्यापासून कण्ह नावाचा मुलगा झाला.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वयात आल्यावर ब्रह्ममंत्र शिकण्याकरता तो दक्षिण भारतात गेला. परतल्यानंतर त्याने राजापाशी राजकन्या मद्दरूपीला मागणी घातली, संतापून राजाने कण्ह ऋषीला ठार मारण्यासाठी धनुष्याला बाण लावला. परंतु ऋषीच्या सामर्थ्याने स्तंभितगात्र झालेल्या राजाला बाण सोडणे वा परत घेणे अशक्य झाले. अमात्य व गणवृद्ध त्याच्याजवळ गेले व त्यांनी राजाला मंत्रपाशातून मुक्त करायची प्रार्थना केली. ऋषी उत्तरला की मंत्रपाशातून मुक्त होण्यासाठी राजाला पुढील तीन पर्यायांनी बाण सोडता येईल— जमिनीच्या दिशेने सोडला तर पृथ्वी भूकंपासारखी तडकेल; वर सोडला तर देव सात वर्षेपर्यन्त वृष्टी होऊ देणार नाही; आणि ज्येष्ठतम राजकुमारावर सोडला तर राज्याचा हा उत्तराधिकारी केसविहीन होईल. राजाने तिसरा पर्याय स्वीकारून स्वतःला मुक्त केले व राजकन्या मद्दरूपीचे ऋषीशी लग्न लावून त्याला प्रसन्न केले.

ही कथा हे स्पष्ट करते की ब्रह्ममंत्र म्हणजे वर्षामाया होती. ही चर्चा पुढे चालवण्या आधी एका चुकीच्या समजाचे निराकरण केले पाहिजे. ८–१००–११ या ऋचेतील वाक्च्या देवी या पदवीचा दुर्गाने दिलेला अर्थ 'दात्रीम् उदकानाम्' असा आहे.[४] परंतु पर्जन्याचे दैवत स्त्रीरूपी असू शकत नाही. मराठी शेतकरी पावसाचा निर्देश अजूनही केवळ 'देव' या पुल्लिंगी शब्दाने करतो. राजा ओक्काकाचे अमात्य व गणवृद्ध यांनी कण्ह ऋषीची अशी प्रार्थना केली— "देवो च वस्सतु (देव वर्षू दे)"[५] अविरत संसारचक्राचे विवरण करताना श्रावस्तीच्या उदय ब्राह्मणाला बुद्ध म्हणाला— "पुनप्पुनं वस्सति देवराजा (पुनः पुन्हा वर्षे देवराजा) ॥"[६] थेर भिक्षु गिरिमानंदाने मुक्तीच्या आनंदात गाथा गाइली— "वस्सति देवो यथा सुगीतं (देव वर्षतो जसे सुगीत) ॥"[७]

पावसाचे वैदिक दैवत पर्जन्य पुरुष आहे. ऋचा ५.८३.१,४* वनस्पती व भूमी यांच्यात वीर्योत्सर्ग करायचे पर्जन्याला आवाहन करतात—

'त्या विक्रांत विभूतीचे यश गा; ह्या अशाच स्तुतींनी पर्जन्याची प्रशंसा कर आणि प्रणतिपूर्वक त्याची सेवा कर. तो वीरपुंगव पर्जन्य गडगडाट करून तात्काळ वर्षाव करितो आणि औषधी वनस्पतींमध्ये आपले (वृष्टिरूप) वीर्य बीजरूपाने प्रविष्ट करून देतो. १.

---

* या सूक्ताचा ऋषी अत्रि भौम आहे हे वैशिष्ट्यपूर्ण आहे. भौम या मातृनामाचा अर्थ होतो, 'भूमातेचा पुत्र.'


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'– मग वादळी वारे जोराने वाहूं लागतात, विजांचे कडकडाट चालू होतात, औषधींना अंकुर फुटूं लागतात, नभोमंडळ मेघांनी गर्द भरून जाते आणि सर्व जगा(चे पोषण होण्या)करिता पृथ्वीवर धान्यसमृद्धि होते. परंतु हा सर्व चमत्कार पर्जन्य हा धरणीवर आपल्या (उदकरूप) वीर्यवृष्टीचा प्रसाद करतो तेव्हा घडून येतो. ४.'[८]

म्हणूनच अथर्ववेदीय भूमि–सूक्ताची १२.१.१२ ही ऋचा भूमीला मानवजातीची माता व पर्जन्याला पिता असे संबोधते– '... भूमी माता आहे, मी तिचा पुत्र आहे; पर्जन्य पिता आहे ...'[९]

जगभरच्या सनातन समजुतीप्रमाणे प्राचीन भारतीयांचा असा विश्वास होता की चंद्र हा वृष्टीचा जनक आहे. ऐतरेय ब्राह्मणात ( ८–२८ ) या लोकविश्वासाचा प्रतिध्वनी उमटलेला आहे – '... वृष्टी चंद्रापासून जन्मते (चन्द्रमसो वै वृष्टिर् जायते ।)'[१०] सोम हा चंद्रदेव असल्याने ऋचा १.१६४.३५ त्याच्या वीर्यसंपन्नतेची तुलना बलवान् घोडयाच्या रेताशी करते. अश्वमेधात गणमाता ( अंबा वा महिषी ) बळी दिलेल्या घोडयाला 'रेतो–धा' म्हणून हाक मारते व त्याचे वीर्य तिच्या योनीत ओतायचे त्याला आवाहन करते.[११] मेध्यपशु घोडा हा चंद्रदेव सोमाचा प्रतिनिधी होता, तर गणमाता ही भूमातेचे प्रतिनिधित्व करीत होती. रेतो–धाचा अर्थ 'वर्षा–कार' असाही होतो. या वर्षाकार चंद्राला बृहदारण्यक उपनिषद् (३.१.६) ब्रह्मन् असे संबोधते.

ब्रह्मन्‌च्या कार्याचे सर्वोत्तम निरूपण ऋष्यशृङ्गाची कथा करते. ही कथा रामायणाचा ( १.९–१० ) अविभाज्य भाग आहे, महाभारतात ( ३. ११०–११३ ) ती रामायणाबरोबर पुनर्निवेदित केली गेलेली आहे व बौद्ध निळिनिका जातकात ( ५२६ ) ती लोककथा म्हणून सांगितली गेलेली आहे. या तिन्ही कथा संबंधित राज्यांना–महाकाव्यामध्ये अंग देश व जातकात काशी देश–भीषण व प्रदीर्घ दुष्काळाने कसे ग्रासले होते या हकीकतीने सुरू होतात. जातकाची हकीकत जास्त साक्षात्कारी आहे–

'......त्याने ( शक्राने ) तीन वर्षेपर्यंत सबंध काशी राष्ट्रात पाऊस पाडला नाही. सारे राष्ट्र अग्नीने दग्ध झाल्यासारखे झाले. शेती थांबली. दुर्भिक्षाने हैराण झालेले लोक राजवाडयासमोर जमले व आक्रोश करू लागले, "देवा ! देव वर्षव !"'[१२]

काशीच्या ब्रह्मदत्त राजाने मग आपली कन्या निळिनिका इला सांगितले–

'१. "उद्दह्यते जनपदो, रट्ठम् चापि विनस्सति"'[१३]

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

[ " जनपद जळत आहे, व ( सामूहिक ) राष्ट्र ( कृषीचा ) विनाश होत आहे. " ]

खरे कारण, किंवा काटेकोरपणे बोलायचे तर लोकांच्या समजुती प्रमाणे खरे कारण, केवळ महाभारतानेच ( १. ११०. ४२–४५ ) दिले आहे. अंग देशाचा राजा लोमपाद याच्याकडून अपमानित झालेल्या ब्राह्मणांनी त्याचा परित्याग केला व त्यामुळे इंद्राने त्या राज्यावर वृष्टी होऊ दिली नाही. तिन्ही कथांचे याबद्दल एकमत आहे की अवर्षणावर एकमेव उपाय म्हणजे राजकन्येचा महाकाव्यांमध्ये शांता व जातकात निळिनिका–वीर्यसंपन्न तरुण ऋषी ऋष्य-शृंगाशी संयोग, ज्याला त्याच्या पित्याने अरण्यात अशा रीतीने वाढवलेले होते की त्याला स्त्रीजातीच्या अस्तित्वाविषयी यत्किंचितही कल्पना नव्हती. या आरण्यक ऋषीला राजधानीत आणवण्यासाठी राजा सुंदर वेश्यांना पाठवीत असल्याचे महाकाव्यकथा दाखवतात, तर राजा खुद्द आपल्या कन्येलाच खालील आदेश देऊन अरण्यात पाठवीत असल्याचे जातक दाखवते –

" एहि निळिनिके गच्छ, तं मे ब्राह्मणं आनय " [१४]

[ " इकडे ये, निळिनिके, जा, व ब्राह्मणाला वश कर ! " ]

रामायणकथा सांगते की वेश्यांकडून ऋष्यशृंग राजधानीकडे आणला जात असताना देवाने त्या देशावर अचानक पर्जन्याचा वर्षाव केला (१.१०.२९) महाभारतीय संस्करण सांगते करते की ऋष्यशृंगाचा अंत:पुरात प्रवेश करवला जाताच पर्जन्यवृष्टी झाली (३.११३.१०).

परंतु जातककथा वर्षामायेच्या मूळ कल्पनेच्या सर्वात जवळ आहे. ती सांगते की खत्तिया निळिनिका[१५] व ब्राह्मण इसि ( ऋषि ) सिङग यांचा समागम होताच शक्राने काशी राज्यावर पर्जन्यवर्षाव केला.[१६] इसि सिङगाने निळिनिकेशी तीन वेळा संभोग केला हे वैशिष्टयपूर्ण आहे; यावरून दिसते की तो विधिपूर्वक संभोग होता. कारण १०. ९५. ५. या ऋचेत उर्वशी पुरूरव्याला सांगते की तो दिवसातून तीन वेळा तिच्याशी संभोग करीत असे. रामायण व महाभारताच्या म्हणण्याप्रमाणे तो केवळ विधिपूर्वक समागम नव्हता. रामायण ( १. १०. ३२ ) सांगते की रोमपाद राजाने राजकुमारी शांतेचा ऋष्यशृंगाशी विवाह लावला. कुमारस्वामींनी केलेल्या विद्वत्तापूर्ण विवेचनाप्रमाणे तो क्षत्र व ब्रह्मन् यांच्यातला देवविवाह होता–

' असे म्हटले जाऊ शकते की, ऐतरेय ब्राह्मण ८. २७. मध्ये ब्रह्मन् पुरोहिताने राजाला उद्देशून म्हटलेल्या " तो मी आहे, ती तू आहेस, आकाश

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मी आहे, पृथ्वी तू आहेस ", इ० वैवाहिक सूत्रात सबंध भारतीय राज्यशास्त्रीय तत्त्वज्ञान गृहीत व अंतर्हित आहे. असे असले, तरी हे शब्द पुरोहिताला उद्देशून राजा बोलत असल्याचा दावा केला जात असल्यामुळे, जर हे तत्त्वज्ञान समजून घ्यायचे असेल तर हे निर्णायकरीत्या सिद्ध केले पाहिजे की– सायण निःसंदिग्धपणे सांगतो त्याप्रमाणे– हे शब्द पुरोहित उच्चारतो. इतर अनेक संदर्भांचा तुलनात्मक अभ्यास दाखवील की ब्रह्म व क्षत्र यांच्या या "विवाहात" राजा हा निर्विवादपणे " स्त्रीपक्ष " असल्यामुळे ते शब्द राजाकडून म्हटले जाणे असंभवनीय आहे.'[१७] ते या मुद्याचे जास्त विवरण करतात–

'हे शब्द, ज्यांचा सायण–राज्ञः पुरोहितवरणमन्त्रम्–असा निर्देश करतो, ते पुरोहितच राजाला बोलत असला पाहिजे हे क्षत्राच्या संबंधात ब्रह्मन्च्या पुरुषत्वाबद्दल अगोदरच जमा झालेल्या पुराव्यावरून सिद्ध झालेले आहे, असे म्हटले जाऊ शकते. अमोऽहम् अस्मि हे पुरोहितच बोलत असला पाहिजे याला छांदोग्य उपनिषदात ( ५.२.६ ) भावी राजा अग्नीला ( देवी पुरोहित ) उद्देशून–अमो नामाऽसि, "तुझे नाव ते ( वा 'तो' ) आहे," हे शब्द बोलतो यावरून पुष्टी मिळते; पहा छांदोग्य उपनिषद, ६.१-१, "सा ही ( पृथ्वी ) आहे, अम अग्नि आहे." "मी तो आहे" हे शब्द पुरोहितच उच्चारतो असे सायणाने निःसंदिग्धपणे म्हटलेले आहे ( ऐतरेय ब्राह्मण, भाष्य, बिब्लियोथेका इंडिका, १८९६,४.२८८, ओळ ८, पुरोहितः अहम्, अमः । सायण हेही स्पष्ट करतो की 'या ओषधी...' पासून सुरू होणारा बाकीचा सबंध भागही पुरोहिताकडून म्हटला जातो, जो राजाने त्याला दिलेल्या आसनाचे अभिसिंचन करतो व राज्याला अभिवृद्धीचा आशीर्वाद देतो. पुरोहित हा "पुरुष" आहे व राजा हा "स्त्री" लक्षात घ्या की, अथर्ववेद ३.४.१ मधले "तू राज्य कर" ( त्वं वि राज । ) हे शब्द राजाला उद्देशून आहेत, आणि अथर्ववेद २.३६.३ मधले "ही राज्य करो" ( वि राजतु हे शब्द पत्नीला अनुलक्षून म्हटलेले आहेत.'[८]

नष्ट झालेली वास्तवता विधी जतन करीत असतो. 'स्त्री' राजा व व 'पुरुष' पुरोहित यांचा समलिंगी विवाह हा राष्ट्री व ब्रह्मन् यांच्या स्त्रीसत्ताक देवविवाहाची पितृसत्ताक दुरुस्त आवृत्तीमात्र होती या घटनेवर केरळ पुन्हा जास्त प्रकाश टाकतो.

केरळच्या इतिहासातील इ. स. २१६ पूर्वीचा काळ 'ब्रह्मन् काळ' म्हणून गणला जातो. या काळातील समाजाचे पायाभूत घटक थर व संकेतम् हे होते–

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'...परंपरा व केरलोत्पत्ती यानुसार परशुरामाने ब्राह्मणांचे या नव्या भूमीत वसाहत करायला मन वळवले, व असे सांगितले जाते की मोबदल्यादाखल त्याने या सबंध भूमीचे त्यांना दान केले. त्याने थर ( नायर गावे ) व संकेतम् ( शब्दशः अर्थ ' नियोजित स्थाने ', वा ब्रह्मन् राज्याचे आयर्लंडमधील इंग्रजी पेलशी जुळतेमिळते असे केलेले विभाग ) यांची स्थाने आखून दिली, ६४ ग्रामन वा ब्रह्मन् गावांची प्रतिष्ठापना केली व लोकसत्ताक शासन सुरू केले......'[१९]

संकेतचा शब्दशः अर्थ होतो स्त्रीपुरुष शरीरसंबंध. महाभारत (२.२७.१६;३२.९ ) सांगते की अर्जुन व नकुल यांनी स्वतंत्रपणे व वेगवेगळ्या दिशात उत्सव–संकेत नावाचे गण जिंकले. टीकाकार नीळकंठ खुलासा करतो–

' उत्सव–संकेतांमध्ये पुरूष व स्त्री यांना एकमेकांबद्दल वाटणारे आकर्षण हे स्त्रीपुरुष शरीरसंबंधाला पुरेसे कारण होते. विवाहपद्धत त्यांच्यांत अस्तित्वात नव्हती. त्यांचे लैंगिक जीवन जनावरांप्रमाणे भेदाभेदशून्य होते.[२०]

उत्सव म्हणजे समन वा समाज, व या समासाचा अर्थ होतो असा की ज्यांत लैंगिक स्वैरसंभोग होई...म्हणून उत्सव–संकेत हे कोणा विशिष्ट गण वा गणसंघाचे नाव नसून जे गण उत्सव–संकेताची प्रथा पाळीत त्यांची सर्वसामान्य संज्ञा होती.

संस्कृतात ' थ ' चा अर्थ होतो अन्न. नायर थरची व्युत्पत्तीही ' थ ' या धातूपासून झालेली आहे ज्याचा अर्थ होतो माता.[२१] मातेसाठी तामिळ शब्द आहे ' ति. '[२२] वृद्ध बौद्ध भिक्षुणीला थेरी म्हणत व स्त्रीसाठी सामान्य पाली संज्ञा आहे इत्थी. धुळे जिल्ह्यात राहणाऱ्या भिल्ल आदिवासींच्या भिलोरी भाषेत स्त्रीला थेई म्हणतात. ही आदीवासी जमात धुळे जिल्ह्याच्या पश्चिम भागापासून सुरू होऊन बलसाड, सुरत व भडोच या गुजराथी जिल्ह्यांमधून जात राजस्तानापर्यंत पसरलेल्या सलग पट्ट्यात राहते. अशाप्रकारे अनेक संस्कृतेतर भाषा व लोकभाषांमध्ये थ या धातूचा अर्थ स्त्री वा माता असा होतो. थेरीचा संस्कृत पर्यायवाची शब्द स्थ–विरा हा आहे. हा शब्द तथाकथित स्था या धातूपासून निघालेला नसून संस्कृतेतर थ पासून निघालेला आहे, हे उघड आहे- १०.८६.९ या ऋचेत इंद्राणी स्वतःला वीरिणी म्हणते. त्याचा सामान्यतः अर्थ होतो वीरस्त्री. पण वीरिण हा इरिणचा पर्यायवाची आहे व म्हणून त्याचा अर्थ राष्ट्रभूमी असाच व्हायला पाहिजे. म्हणून वीरिणी राष्ट्री वा देवीचा पर्यायवाची आहे. स्थविराचा अर्थ नंतर जरी वृद्ध भिक्षुणी होऊ लागला, तरी मुळात तो कुळ वा ज्ञाति वा गण यांच्या मातांचा वाचक असला पाहिजे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्थल या शब्दाची अशीच दशा झालेली आहे. ४.१.४२ हे पाणिनीय सूत्र त्याचा अर्थ 'नैसर्गिक (अकृत्रिम) कोरडवाहू जमीन' असा करते. परंतु नदीच्या पाण्याने कृत्रिमपणे व बारमाही ओलवल्या जाणाऱ्या जमिनीला महाराष्ट्रात अजूनही थळ असे म्हणतात. थळ हा शब्द त्याच थ धातूपासून निघालेला आहे हे उघड आहे आणि ज्याप्रमाणे मातृकाचा अर्थ कालवा वा पाट असा होतो त्याप्रमाणे थळचा अर्थ मातृकाने ओलवली जाणारी जमीन असा होतो. ज्याने अजून समाधानकारक खुलाशाला दाद दिलेली नाही त्या थळ शब्दाचा अर्थ बुद्धकाळात 'थळ-शेतीचा अध्यक्ष' असा होत असला पाहिजे; इसिदत्त पुराण हा कोशलराज पसेनदिचा थ-पती होता.[२४] श्रावस्तीच्या पञ्चकाङ्गासारखे इतरही थपति होते.[२५]

थरची व्याख्या पद्मनाभ मेनननी खालीलप्रमाणे केली आहे—

'...... समाजव्यवस्थेच्या बाल्यावस्थेशी सुसंगत असा घटक एकत्र कुटुंब हा होता. केरलम्च्या मूळ रहिवासी वा वसाहतकर्त्यांची अशी अनेक एकत्र कुटुंबे राजकीय व व्यवस्थापकीय कारणांसाठी संघटित झाली व त्यांनी ग्रामसमाज स्थापले. ब्रह्मन् ग्रामसमाजांना ग्रामम् व अ-ब्रह्मन् ग्रामसमाजांना स्थलविभागानुसार थर, कर, पिथिक,* चेरि, मुरि व देशम् अशा संज्ञा प्राप्त झाल्या ... ...'[२६]

थर्स्टन् व रंगाचारी हे थरची जास्त काटेकोर व्याख्या देतात—

'... थर हा मुलकी व्यवस्थेसाठी नायरांच्या संघटनेचा प्रादेशिक घटक होता व त्याचे शासन या जातीच्या करणवेर वा वृद्ध अशी संज्ञा असलेल्या प्रतिनिधींकडून होई ... प्रत्येक थरात त्यांची चार कुटुंबे समाविष्ट असावी असे दिसते ...'[२७]

एकत्र कुटुंब ही सामंतप्रथाक संस्था असून ती सामंतप्रथापूर्व कुल या संस्थेतून जन्माला आली हे अगोदर दाखवले गेलेलेच आहे, आणि थर हा अनेक एकत्र कुटुंबांचा बनलेला असल्यामुळे तो नायरांची ज्ञातिवसाहत होता हे उघड आहे. थर वा देशम् हा व्यवस्थापकीय व राजकीय कार्यांची पूर्तता करणारा प्रादेशिक घटक होता, तर थरवाड ही मालमत्ता व राज्य यांच्या वंशक्रम व वारसाहक्क यांचे 'मरुमक्कट्टायम्' नावाच्या कायद्यानुसार स्त्रीपरंपरेने नियमन करणारी नातेवाईकसंघटना होती. थर वा देशम्चे अधिपत्य देसवे वा देशवाळी

---

* पिटक या पालि शब्दाचा (उ० विनयपिटक) अर्थ करंडी असा होतो. त्याचा पिथिकशी निगडीत संबंध असला पाहिजे हे उघड आहे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नावाचा पुरुष करी, आणि करणवेर नामक पुरुष जरी मातृथरवाड वा त्याच्या थावळींच्या मालमत्तेचा कारभार पाही आणि त्यांचे व्यवस्थापकीय व राजकीय प्रतिनिधित्व करी, तरी इतर सर्व बाबतीत थरवाड व थावळी आपले स्त्रीसत्ताक स्वरूप अबाधित ठेवीत–

'थारवडची मालमत्ता व घर यांचे स्वामित्व कुटुंबातल्या स्त्रियांकडे असते, पण प्रत्यक्ष कारभारमात्र कर्णवन् नावाच्या ज्येष्ठतम पुरुषाकडे असतो. हा शब्द एका संस्कृत धातूपासून बनलेला असून त्याचा अर्थ होतो "कामे करणारा." तो उत्तर भारतीय कर्ताचा पर्यायवाची आहे. कर्णवन्पदाचे उत्तराधिकारित्व वय व पिढी यावर आधारित असते. कर्णवन्चा उत्तराधिकारी प्रथम त्याचे लहान भाऊ व नंतर त्याच्या ज्येष्ठतम बहिणीचा ज्येष्ठतम मुलगा असे होतात. कोणताही मनुष्य वा मुलगा त्याच्या नावाने व तो ज्या थारवडचा असेल त्या थारवडच्या नावाने ओळखला जातो. थारवाडचे नाव नेहमी त्याच्या पूर्वजेवरून पडते व त्याचा निर्देश अमुकअमुक ( स्त्री ) चे थारवड असा केला जातो. थारवडविहीन माणसाला (समाजात) मान नसतो. एका कारखान्याच्या अधिकाऱ्याने मला सांगितले, की जरी तो सुशिक्षित व पगारदार होता तरी ते भूमिहीन अनाथ असल्यामुळे त्याच्या तोलाचे सामाजिक स्थान त्याला मिळू शकत नव्हते. जर त्याने जमीन खरीदली, घर बांधले व त्याच्या बहिणीसह तेथे स्थायिक होऊन तिच्या मुलांचे संगोपन केले, तर त्यांचा सामाजिक दर्जा वाढेल. तो म्हणाला की त्याच्या कारखान्यात काम करणाऱ्या अशा अनेक दरिद्री कामगारांची त्याला माहिती आहे, की जे आपल्या बहिणींच्या नावावर थारवड स्थापून त्यांच्या जातीत 'काहीतरी' बनण्यासाठी पैशांची बचत करीत आहेत.'[२८]

करणवेर हा सर्वसामान्यपणे आईचा भाऊ असतो व त्याला अम्मान अशी हाक मारतात.[२९] अम्मान् हा शब्द अम्मा, म्हणजे आईपासून बनलेला आहे.[३०] द्रविडेतर भारतात सर्वदूर प्रचलित असलेला मामा हा शब्दही मा या मातृसंज्ञक शब्दापासून निघालेला आहे. यावरून हे स्पष्ट होते की मालमत्तेच्या कारभाराची व शासनव्यवस्थेतील अधिकाराची सूत्रे मातृवंशक कुलातील ज्येष्ठतम पुरुषाकडे येण्याआधी ती त्या कुलाच्या अम्मा वा मा कडेच होती. मातृवंशक ज्ञातीच्या राजकीय अधिपत्याचीही अशीच अवस्था आहे. देशवाळि हा समास देश व वाळि या दोन शब्दांपासून बनलेला आहे. वाळि वा वज्ञि चा अर्थ होतो वंशक्रम.[३१] या अधिकाऱ्याच्या दर्जाचा मराठी वा गुजराथी अधिकारी होता

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

देसाई. हा शब्द देश व आई यांचा समास असल्याने त्याचा अर्थ देशमाता होत असून तो जनपदकल्याणीचा पर्यायवाची असल्याचे उघडपणे दिसते.

हे अगोदर दाखवले गेलेलेच आहे की थरवाड मुळात ज्ञाति होते व ते थावळि नावाच्या कुलांनी बनलेले होते. कुळकायदे जारी होण्यापूर्वी मातृ-थरवाड व कन्या–थावळींची जमीन समाईक मालकीची होती.[३२] याचा स्पष्ट अर्थ हा होतो की जमीनमालकीच्या अनुबंधात ज्ञाति हा स्त्रीसत्ताक कृषक गणाचा सर्वात महत्वाचा घटक होता, आणि म्हणूनच केरळचा सर्वात महत्वाचा प्रादेशिक, व्यवस्थापकीय व राजकीय घटक थर वा देशम् हा होता.

आता 'ग्राम' चा अर्थ काय होतो ? त्याचा सर्वसामान्य अर्थ गाव वा खेडे असा होतो. विनयपिटक सांगते की त्याकाळी एककुली तसेच अनेक कुली गावे होती ( ...... एक–कुलस्स गामो होति ...... नाना कुलस्स गामो होति ...... । ).[३३] त्याचा दुसरा वाच्यार्थ विदुराने धृतराष्ट्राला केलेल्या उपदेशावरून स्पष्ट होतो ( १.११४.३८–३९ ) "त्यजेद् एकं कुलस्य–अर्थे ग्रामस्य–अर्थे कुलं त्यजेत् । ग्रामं जनपदस्य–अर्थे आत्मा–अर्थे पृथिवीं त्यजेत् ॥

[ "कुलाच्या हितासाठी व्यक्तीचा त्याग करावा, ज्ञातीच्या हितासाठी कुलाचा त्याग करावा, गणाच्या हितासाठी ज्ञातीचा त्याग करावा व आत्म्याच्या मुक्तीसाठी पृथ्वीचा त्याग करावा." ]

इरावती कर्वे म्हणतात की उत्तर भारतीय खेडी एका कुलाने वसवली आहेत, तर दक्षिण भारतीय खेडी अनेक अन्योन्यविवाही कुलांनी.[३४] याचा अर्थ असा की ग्रामचा अर्थ प्राचीन भारतातील पितृसत्ताक प्रदेशांमध्ये कुलभूमी असा होता, तर स्त्रीसत्ताक वा मातृवंशक प्रदेशांमध्ये ज्ञातिभूमी असा होता, म्हणून ग्रामचा अर्थ केरळातही ज्ञातीच होता. नायर थर व ब्रह्मन् ग्राम हे परस्परांशी संकेत वा शरीर संबंधाच्या नात्याने बांधलेले होते. याचे प्रत्यंतर नायर व क्षत्रिय स्त्रिया आणि नंबूथिरी पुरुष यांच्यातील संबंधम् विवाहाच्या पूर्वापार व वैशिष्टयपूर्ण प्रथेवरून येते. यावर इरावती कर्वे यांनी महत्वपूर्ण प्रकाश टाकला आहे. नंबूथिरी ब्राह्मण पितृसत्ताक आहेत तर बाकी सर्व मल्याळी जनता मातृवंशक. नंबुथिरी कुटुंबातल्या वडील एक वा दोनच मुलांना लग्न करायची परवानगी असते– व तीही त्यांच्याच जातीत; बाकीची मुले नायर वा क्षत्रिय स्त्रियांशी संबंधम् नाते जोडतात.[३५] पण येथे हे लक्षात घेणे आवश्यक आहे की, जरी नंबूथिरी एकत्र कुटुंबातला ज्येष्ठतम मुलगा लग्न करून कौटुंबिक जीवन

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व्यतीत करू शके, तरी तोही एखाद्या नायर वा क्षत्रिय स्त्रीशी संबंधम् नाते जोडू शके.[३६] या नात्यात नंबूथिरी हे त्यांच्या नायर वा क्षत्रिय पत्न्यांच्या घरी प्रसंगवशात येणाऱ्या अभ्यागतांप्रमाणे येत– '... कोचिनजवळ एका श्रीमंत नायर थारवडच्या मालकीचे खेडे असून त्याचे नाव आहे "नंबुद्रींच्या संध्या-भेटींचे गाव" ......[३७]

संबंधम् नात्याचे लेखिका खालीलप्रमाणे जास्त विस्ताराने वर्णन करते–

'मातृवंशक घरांमध्ये पिता हा त्याच्या पत्नीच्या घरी एक अभ्यागतमात्र असतो; पण संपन्न क्षत्रियांमध्ये नंबुद्री पिता बऱ्याचदा त्याच्या पत्नीच्या घरातच राहातो. जर तो नंबुद्री कुटुंबातला वडील मुलगा असेल तर त्याच्या नंबुद्री भाऊबंदकीतल्या पितृवंशक वाड्यात त्याचे स्वतःचे घर व गृहिणी असते. असा माणूस आपल्या वेळेची या दोन घरांमध्ये विभागणी करतो. त्याच्या नंबुद्री घरात तो घर व मालमत्तेचा मालक असतो व त्याच्या मुलांचे संगोपन करायची जबाबदारी त्याच्यावर असते. त्याच्या क्षत्रिय पत्नीच्या घरी त्याला कसलेही स्थान नसते. तो त्या स्त्रीचा मित्र व प्रियकर असतो, त्याच्या मुलांचाही मित्र व काही वेळा शिक्षक; पण त्याच्या मुलांचा पालक असतो त्याच्या पत्नीचा भाऊ, म्हणजे मामा. ही विशिष्ट परिस्थिती समजून घेण्यासाठी रोटीव्यवहाराबाबतचे सर्व जातीय निर्बंध येथे लक्षात घेतले पाहिजेत. असा क्षत्रिय संबंध असला, व विशेषतः एखाद्या राजकन्येचा तो पती असला, तर नंबुद्रीला त्यात मोठेपणा वाटतो. क्षत्रिय स्त्रिया वा त्यांचे पालक सर्वोत्कृष्ट नंबुद्री तरुण निवडून काढतात. ते सुखी कुटुंबातले, विद्वान् व देखणे असावे लागतात. पत्नीच्या कुटुंबात राहाणारा नंबुद्री गृहस्थ त्या कुटुंबाबरोबर जेवत नाही, तर वेगळा जेवतो. त्याला त्याची स्नाने व विधी करायचे असतात. रूढीमुळे त्याला त्याच्या पत्नीशी सौहार्दाचे संबंध ठेवायची मनाई असते. व ती अंतःपुरात असल्यामुळे तिची भेट त्याला कधीकधीच होते. तो संस्कृतवाचन करून, चौपट खेळून व कथकली नृत्याचे कार्यक्रम संघटित करून आपला वेळ घालवितो. तो त्याच्या मुलांचा मित्र असू शकतो. व बऱ्याच बाबतीत असतोही. पण जसजसे ते मोठे होतात व वेगवेगळ्या जबाबदाऱ्या स्वीकारतात तसतसे ते त्याच्यापासून दूर जातात. मी एका क्षत्रिय कुटुंबात रक्ताचे नमुने घेत होतो. मी एकाचे सोडून बाकी सर्वांचे नमुने घेतले– तो म्हातारा असून किंचित बाजूला उभा राहून काय चालले ते पाहात होता. मी एका तरुण माणसाला सांगितले की मला त्या वृद्ध गृहस्थाचाही नमुना घ्यायचा आहे. मला उत्तर मिळाले "तुमची इच्छा असेल तर घेऊ शकता. पण ते आमच्यापैकी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाहीत. ते आमचे नंबुद्री वडील आहेत ! " नंतरच्या चौकशीत आढळून आले की तो एका नंबुद्रीचा एक कनिष्ठ पुत्र असून त्या क्षत्रिय कुटुंबात ज्येष्ठतम मुलीचा पती म्हणून घेतला गेलेला होता, आणि तेथेच राहून तो जवळ जवळ एखाद्या आश्रिताप्रमाणे वृद्ध झाला होता ... '[३८]

वांशिक व सांस्कृतिक दृष्ट्या केरळचे क्षत्रिय व नायर हे अभिन्न आहेत.[३९] जर क्षत्रिय व नायर यांच्यातील वैवाहिक उच्चनीच भाव, नंबुथिरी कुटुंबातील वडील एक वा दोनच मुलांना लग्न करू देणारी प्रथा यांच्यासारखे वैधर्मी व गोंधळात टाकणारे घटक वगळून काढले, तर प्राचीन स्त्रीसत्ताक केरळमधील नायर ज्ञातीच्या स्त्रिया व नंबूथिरी ज्ञातीचे पुरुष यांच्यामधील आद्य संकेत वा संबंधम् प्रघातापर्यंत आपण जाऊन पोहोचतो. एका समान पूर्वजेचे संतान असल्यामुळे एकाच ज्ञातीचे सदस्य आपापसात लैंगिक संबंध ठेवू शकत नव्हते, आणि गण स्त्रीसत्ताक असल्यामुळे एका ज्ञातीचे पुरुष दुसऱ्या ज्ञातीच्या स्त्रियांशी स्त्रीप्रधान व बहुपतिक शरीरसंबंध करीत. थर्स्टन व रंगाचारी यांनी उद्धृत केल्याप्रमाणे हॅमिल्टन म्हणतो की नायर स्त्रिया एकाच वेळी अनेक पुरुषांशी वैवाहिक संबंध जोडीत—

'...... " नवऱ्यांमध्ये, " ज्यांच्याबद्दल तो ( हॅमिल्टन ) म्हणतो की ( एका स्त्रीचे ) एका वेळी, जास्त नसले तरी, बारा नवरे असू शकत, " चांगले सामंजस्य असते, कारण ते लग्नाच्या कालानुक्रमाने व आपसात ठरवल्याप्रमाणे दहापेक्षा कमी वा जास्त दिवसाच्या पाळीने तिच्या समागमात राहतात. जो तिच्या समागमात राहतो तो तिच्या योगक्षेमाची सर्वतोपरी व्यवस्था करतो व अशा प्रकारे तिच्या यथास्थित तरतुदीचे चक्र अखंडपणे चालू राहते. तिच्याशी समागम करणारा माणूस जेव्हा तिच्या घरात जातो तेव्हा तो आपली शस्त्रे तिच्या दाराशी ठेवतो, आणि गाठ प्राणाशी असल्यामुळे कोणीही ती हलवू शकत नाही वा घरात प्रवेश करू शकत नाही ... '[४०]

दुसऱ्या युरोपियन प्रवाशांनी नमूद केलेले असे अनेक जुने वृत्तांत ब्रिफॉने उद्धृत केलेले आहेत.[४१] नायर स्त्रीचे हे पती दुसऱ्या थरवाडचे असत हे इरावती कर्वे यांनी स्पष्ट शब्दात मांडले आहे—

'... ते ( थारवड ) एक स्त्री, तिच्या बहिणी व भाऊ व तिची स्वतःची व तिच्या बहिणींच्या मुलींची मुले व मुली यांनी बनलेले असते. या घरातल्या सर्व स्त्रियांचे पती दुसऱ्या थारवडचे असतात आणि ते अधूनमधून संध्याकाळी आपापल्या पत्नींच्या भेटीला येतात वा एखाद्या खास मेजवानीला आमंत्रित केले जातात. या थारवडच्या सर्व पुरुषांच्याही बायका दुसऱ्या थारवडांमध्ये राहातात.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जेथे हेही पुरुष त्यांच्या भेटीला जातात. अशाप्रकारे कोणतेही कुटुंब कोणत्याही सोयऱ्याला सग्यांबरोबर एका घरात राहू देत नाही. त्याप्रमाणे पुरुषांचीही मुले, ती जरी रक्तसंबंधी नातेवाईक असली तरी, घरातून वगळलेली असतात. माणसाची आई, भाऊ, बहिणी, मावशा, मामा, बहिणींची मुले व मुली एका घरात राहातात ... केव्हा केव्हा अपवाद म्हणून एक वैवाहिक नातेवाईक या स्त्रीप्रधान घरात राहायला आणली जाते. ही नातेवाईक म्हणजे ज्येष्ठतम पुरुष कर्णवनची पत्नी. कर्णवन् हा सर्वसामान्यपणे मामा असतो ( वर्धिष्णु मुलांच्या दृष्टिकोनातून ) व त्याला अम्मान् म्हणतात. या स्त्रीप्रधान घरात राहायला आणलेल्या त्याच्या पत्नीला 'अम्माइ अम्मा' म्हणतात. तिची उपस्थिती या स्त्रीप्रधान घराच्या सदस्यांना नापसंत असते. सर्वसामान्यपणे ती या कुटुंबाच्या इतर सदस्यांबरोबर राहात नाही आणि ती त्यांच्यापासून काहीशा वेगळ्या अशा निवासस्थानात राहाते. नवरा आधी मेल्यानंतर या बाईचे काय होते याचा मला उलगडा केला गेला नाही...'[४२]

स्त्रीसत्ताक वा मातृवंशक लोकांमध्ये सोयऱ्यांकरता फार थोड्या संज्ञा असतात. नायरांमध्ये दिराकरता संज्ञा नाही.[४३] अशा समाजांमध्ये पती व पत्नी एकमेकांचे केवळ 'मित्र' असतात, ज्यातून हे स्पष्ट होते की ते एकाच गणाच्या वेगवेगळ्या ज्ञातींचे सदस्य असतात. भारतातील स्त्रीसत्ताक व मातृवंशक लोकांमध्ये प्रचलित असलेल्या नात्यागोत्याच्या संज्ञांचे तपशीलवार परीक्षण करून इरावती कर्वे सार काढतात–

'विवाहद्वारा जोडल्या गेलेल्या नात्यांकरता अत्यंत थोडे शब्द आहेत. मातृसत्ताक समाजात, जेथे नवरा हा अभ्यागत वा सन्माननीय आगंतुक म्हणून सासूच्या प्रांगणात राहातो, तेथे वैवाहिक नातेवाइकांसाठी संज्ञांची दुर्मिळता असणे अपेक्षित आहे. आपण पाहिले त्याप्रमाणे, आसाम व त्याच्या टेकड्यांपासून देशाच्या अगदी विरुद्ध कोपऱ्यात वसलेल्या मातृवंशक केरळमध्येही अशीच अवस्था आहे.

( खासींमध्ये ) पती वा पत्नीसाठी शब्द आहेत इकॉं, त्नग वा लोक् ( मित्र ) ...'[४४]

स्त्रीप्राधान्यतेच्या या स्वैरसंभोगी वा बहुपतिक वा द्वंद्वी कायद्याने स्त्रीसत्ताक वा मातृवंशक गणाचे पुनरुत्पादन होई. नायर गणाचे याच कायद्याने पुनरुत्पादन होत असे. पण या ढाच्यात ब्रह्मन्चा संबंध कोठे येतो ? क्षत्रिय स्त्री व नंबुथिरी पुरुष यांचा संयोग क्षत्रिय संततीला जन्म देई–

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'... ... सर्वसामान्यपणे क्षत्रिय पुरुष हा क्षत्रिय स्त्री व नंबुद्री पुरुष यांचे अपत्य असतो. क्षत्रिय पुरुषाला नंबुद्री स्त्री मिळू शकत नाही, तर तो नायर वा क्षत्रिय स्त्रीचा पती असतो व त्याची मुले एकतर नायर असतात वा दुय्यम दर्जाचे क्षत्रिय असतात. अशा प्रकारे केवळ क्षत्रिय स्त्रीलाच पहिल्या प्रतीची क्षत्रिय संतती होऊ शकते. या उलट क्षत्रिय पुरुषांची सर्व मुले सामाजिक सोपानाच्या खालच्या पायऱ्या गाठत जातात ...... '[४५]

हाच तो कायदा आहे की ज्याद्वारे नायर गणाच्या राज्यकर्त्या ज्ञातीचे पुनरुत्पादन होत आलेले आहे–

'त्रिपुन्निथेर हे कोचिनचे राज-उपनगर आहे. येथे शंभरावर घरे आहेत व त्यांच्या मालकिणी अशा राजकन्या आहेत की ज्यांची मुले कोचिनच्या राजपदाचे संभाव्य वारस आहेत. पहिली दोन वा तीन घरे बऱ्याच मोठ्या आकाराची होती, नंतरची वीस कोचिनच्या मध्यमवर्गीय व्यापाऱ्यांच्या जास्त मोठ्या बंगल्यांसारखी व बाकीची खरोखरच अगदी सामान्य. प्रत्येक घरात एक राजकन्या व तिचा नंबुद्री पती तिचे भाऊ, मुले व मुली यासह राहत होते ...... '[४६]

ब्रह्मन्‌चे आद्य कार्य एका रांगड्या नायर तरुणाने काहीशा असभ्यपणे पण समर्पकपणे बोलून दाखवले.—

'कोचिनमध्ये मला दुसरा एक तरूण माणूस भेटला. ज्याने मातृवंशक घरामधल्या नंबुद्रीचे वर्णन मातेने 'ठेवलेला पुरुष' असे केले, तो जरा असभ्यपणे मांडणी करीत आहे अशी मी हरकत घेताच प्रतिवादादाखल त्याने मला असा प्रश्न केला 'नंबुद्री दुसऱ्या कोणत्या कार्यांची पूर्तता करतो असे तुम्हाला वाटते ?' तो म्हणाला की सामर्थ्यशाली घराणी नेहमी सर्वांत देखणे नंबुद्री निवडीत असतात आणि त्याची फलश्रुती आहे कोचिन व त्रावण-कोरचे अत्यंत सुंदर राज्यकर्ते ... '[४७]

क्षत्रिय राजकन्येने नंबूथिरी पती निवडायची कसोटी जी राष्ट्री-देवी वाक्‌ची होती तीच आहे. क्षत्रियाचे उत्पादन करावयाचा कायदा मातृवंशकते-इतकाच पुरातन आहे. कोचिनचा पहिला राजा हा शेवटचा चेरमान पेरुमाल याची भगिनी व पेरिम्पथप्पु नंबूथिरी यांच्या संयोगातून झाला होता–

'... हे कुटुंब शेवटच्या चेरमान पेरुमालपासून स्त्रीपरंपरेने प्रत्यक्ष वारशाचा दावा करते ... केरळ माहात्म्यम् ( सांगते ) की परशुरामाने रामायणाच्या नायकाचा पुत्र लव याचा एक वंशज. एक सूर्यवंशी क्षत्रिय,

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

थृपून्निथ्थुर येथे जे कोचिन राज्याची अजून राजधानी आहे– गादीवर बसवला. राज्याचा सरकारी वृत्तांत सांगतो : "या राज्याचे सर्वात जुने नाव पेरिम्पयप्पु आहे; कारण कोचिन हा केरळचा तो भाग आहे जो चेरमान पेरुमालच्या भगिनीला पेरिम्पयप्पु नंबूथिरीपासून झालेल्या ज्येष्ठतम मुलाच्या आधिपत्याखाली आला ...'[४८]

अशाप्रकारे क्षत्रिय संतती ही क्षत्र व ब्रह्मन् यांच्या देवविवाहाची फलश्रुती आहे. आता क्षत्र या शब्दाचा अर्थ काय होतो ? ४.१.१३८ या पाणिनीय सूत्रानुसार क्षत्रिय हा क्षत्रचे अपत्य आहे (क्षत्रस्य अपत्यं क्षत्रियः ।). काशिका व सिद्धांतकौमुदीसारख्या नंतरच्या वृत्ति खुलासा करतात की क्षत्रिय हा क्षत्र पिता व माता यांचे अपत्य असते. ही मीमांसा बुद्ध व पाणिनि यांच्या काळातील संघगण व चातुर्वर्ण्य राजेशाह्या यात जारी असलेल्या कायद्याच्या संदर्भातच यथातथ्य आहे. खत्तिय पुरुष व खत्तिय स्त्री यांच्या संयोगातून झालेले अपत्यच खत्तिय ( क्षत्रिय ) असते, अन्यथा नाही, अशी व्याख्या खुद्द बुद्धानेच केलेली होती.[४९]

निघण्टूत क्षत्रम्चे अर्थ उदक ( १.१२.४५ ) व धन ( २.१०.९ ) असे होतात. निरुक्त ( ३.२० ) त्याचा अर्थ सोने असा देते. अशाप्रकारे व्युत्पत्तिशास्त्रीयदृष्टचा आर्य क्षत्रियांचा धनाव्यतिरिक्त कोणत्याही उत्पादक कार्याशी कोणत्याही प्रकारे संबंध नव्हता. शेत नांगरण्यापूर्वी म्हणायचे ४. ५७ हे ऋग्वेदीय सूक्त 'क्षेत्रस्य पतिः' च्या आवाहनाने सुरू होते.[५१] निघण्टूने ( ५.४.८ ) ग्रथित केलेल्या या शब्दाचा अर्थ निरुक्त ( ५. १४, १५, १६ ) गृहपति ( वास्तोष्-पतिः ) असा देते ! हे उघड आहे की आर्यक्षत्रियाचा उदय वर्गसमाज बनलेल्या व मुख्यत्वेकरून पशुपालक असलेल्या गणसमाजात झाला, ज्यात तो सर्वाधिक सत्ताधारी व सैनिक होता.

केवळ एकाच पंडिताने– अर्थात् चाननांना सोडून– हेरले होते की ब्राह्मणी चातुर्वर्ण्याचा क्षत्रिय व अब्राह्मणी पूर्वेचा खत्तिय यांच्यात काहीतरी मूलभूत फरक असावा– आणि तो म्हणजे फिक्. पण दुर्दैवाने तो या समस्येचे सूतोवाच करण्यापलीकडे गेला नाही व जाऊ शकला नाही.[५१] या समस्येची सोडवणूक त्याच दिशेत व काळात अंतर्हित होती की ज्याच्या संशोधनार्थ त्याने आपला अभिजात ग्रंथ लिहिला. बुद्धाने वासेट्ठ ब्राह्मणासाठी खत्तियची व्याख्या– खेत्ताचा* अधिपति तो खत्तिय ( "... खेत्तानं अधिपति ति खो ...

* शेताला संस्कृतात क्षेत्र, खानदेशीत खेत, व गुजराथीत खेतर असे म्हणतात.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

खत्तियो ... । ” )[५२] अशी केली होती. पशुपालक आर्य भारतात येण्यापूर्वी निदान हजार वर्षे तरी अगोदर खेत्तावर आधारलेली संस्कृति अस्तित्वात असल्यामुळे व शेतीत स्थायिक व्हायला आर्यांनी बराच काळ घेतल्यामुळे, क्षत्रची खरी व्युत्पत्ति जाणून घ्यायची वा क्षेत्रस्य पतिःचा क्षत्रशी संबंध जोडायची त्यांना निकड भासली नाही.

आपण हे अगोदरच पाहिले आहे की आर्यपूर्व सिंधु संस्कृतीत, तसेच खासी व मल्याळींच्या अनुक्रमे स्त्रीसत्ताक व मातृवंशक समाजांमध्ये सामायिक क्षेत्राच्या अधिपती स्त्रिया होत्या. म्हणून क्षत्रचा मूळ अर्थ स्त्रीसत्ताक कृषक गणाच्या सत्ताधारी ( ब्रह्मवादिनी ) स्त्रिया असा होता, आणि स्त्रीसत्ताकता म्हणजे केवळ स्त्रियांचेच राज्य असल्यामुळे स्त्री क्षत्र व पुरुष ब्रह्मन् यांच्या देवविवाहाचा उद्देश पुरुष क्षत्रिय जन्माला घालणे हा नसून स्त्री खत्तिया, गणाची संभाव्य राष्ट्री वा देवी, जन्माला घालणे हा होता.

१.१७९ या ऋग्वेदीय सूक्ताने ग्रथित केलेला वैदर्भी राजकन्या लोपामुद्रा व अनार्य कुंभोद्भवी ब्रह्मन् अगस्त्य यांच्यातला देवविवाह याच प्रकरचा होता. या सूक्ताचे खुद्द अधिदैवतच ‘ रतिः ’ आहे. या रतीचा उद्देश अर्थातच प्रजा हा आहे. हे सूक्त गाऊन व अभिनय करून दाखवायचा नाटच–विधी आहे. १–४ व ६ या ऋचांचा चित्राव शास्त्रीकृत अनुवाद खाली दिला आहे–

‘ १. ( लोपामुद्रा म्हणते ), ‘ वृद्धापकाळाच्या खाईमध्ये स्वशरीरास लोटणारी कठोर तपस्या वर्षानुवर्षे, रात्रंदिवस, तसेच प्रतिदिनी मी केली आहे. आता वार्धक्यामुळे गात्रांचा तजेला नष्ट होऊ लागला आहे. ( तरीही तुझ्यासारख्या ) वीर्यशाली पुरुषाला ( माझ्यासारख्या ) स्त्रीचे आकर्षण वाटेलच.

२, ‘ व्रतस्थ, सत्यनिष्ठ, आणि तपस्वी असे प्राचीन ऋषीही स्त्रियांशी संभोग ( उत्सर्ग ) करीतच असत. आजन्म ब्रह्मचर्य राखणे त्यांना साधले नाही. अशा स्थितीत ( ब्रह्मवादिनी ) स्त्रियांही पुरुषांशी संग करीत असल्याच पाहिजेत. ’

३. ( अगस्त्य म्हणतो ), ‘ आपली तपस्या व्यर्थ गेली नाही. देवाच्या कष्टसाध्य संरक्षणकवचाच्या साह्याने समस्त शत्रूंना आपण जिंकले आहे. संभोगाच्या साह्याने पुत्रोत्पत्ती केल्यास आपण दुर्धर संसारयुद्धात विजय प्राप्त करू शकू.

४. ‘ अडवून धरलेल्या जलाप्रमाणे प्रमाथी अशा कामविकाराने माझ्या शरीराच्या अणुरेणूंना व्यापले आहे. वीर्यशाली, प्राणायामी आणि सत्त्वस्थ



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अगस्त्याला चंचल लोपामुद्रेने वश केले असून ती मला ( सर्वांगाने ) भोगत आहे.'

६. (अगस्त्यशिष्य म्हणतो), 'दोन्ही वर्णांचा उत्कर्ष साधणाऱ्या, तसेच अन्न, संतती व बल यांची कामना करणाऱ्या बलवान आणि उग्र अगस्त्य ऋषींनी कुदळीच्या साह्याने भूमी खणून ती समतल केली. त्यांचे प्रयत्न फलद्रूप होण्याचे आशीर्वाद देवांनी त्यांस दिले."[५३]

" उभौ वर्णौ 'चा सर्वात सम्यक् अर्थ क्षत्र व ब्रह्मन् हाच आहे. काणे या देवविवाहाचे इतर दाखले एकत्र आणतात—

'... शतपथ ब्राह्मण ( ४.१.५, सेक्रेड बुक्स् ऑफ द ईस्ट, खंड २६, पृष्ठे २७२–२७५ ) भार्गव ( भृगूचा वंशज ) वा आंगिरस असलेल्या जराजर्जर च्यवन ऋषीची व मनूचा वंशज राजा शर्यातची कन्या सुकन्या यांची कथा निवेदन करतो... ऋग्वेद ५.६१ च्या ऋचा १७–१९ या ब्राह्मण ऋषि श्यावाश्व व राजा रथवीति दार्भ्यची कन्या यांच्या विवाहाना उद्देशून आहेत असा बृहद्देवता ( ५.३० ) अर्थ लावते...'[५४]

कुंतीचा पहिला व खरा ब्रह्मन् पती दुर्वासस् होता ( १.११०.४–७ ). या समासाचा अर्थ होतो मळकट वस्त्रे धारण करणारा वा नग्न. चित्रावशास्त्री आपल्याला सांगतात की तो 'वातरशन', ( शब्दशः अर्थ वायु हेच वस्त्र असलेला, नग्न ) नावाच्या वैदिक ऋषींचा प्रतिनिधी होता.[५५] १०.१३६.२ ही ऋचा या ब्रह्मन् ऋषींचे साक्षात् वर्णन करते–

'– [ असाच प्रकार ह्या पृथ्वीवर जटाधारी जे मुनि त्यांचा आहे. ] वायू हाच अशा मुनींची कौपीन बनलेला असतो. त्यांचे अंग धुळीने धूसर आणि मलीन झालेले असते आणि त्यांनी एखादे वस्त्र परिधान केलेच, तर जे पिंगट मळकट असेल असेच वस्त्र ते नेसतात, आणि वायूच्या झपाट्याच्या वेगाचे अनुकरण करून जेथे दिव्यजनांनाच प्रवेश असतो, तेथेही ते जाऊ शकतात २.'[५६]

पुरूरवस्, काशीची राष्ट्री उर्वशी इचा नियतकालिक राजर्षि पती (रामायण, ७.५६.२६–२७), हा बाल्हीकांची राष्ट्री इळा व चंद्रदेव सोमाचा पुत्र बुध यांच्या देवविवाहाची फलश्रुती होता ( ७.८७–८९ ). इळा बुधाला ब्रह्मन् म्हणून संबोधीत असे ( ७.८९.१६ ). बुध हा सोमाचा भूदेवीपासून, बहुधा निर्ऋतीपासून, झालेला पुत्र होता. बुध हा कृषिकर्माचे विधिपूर्वक अनुकरण करणाऱ्या १०,१०१ या ऋग्वेदीय सूक्ताचा ऋषि आहे.[५७] त्यांच्या सर्वात वैशिष्ट्यपूर्ण अशा तिसऱ्या ऋचेचा मुक्त अनुवाद खाली दिला आहे–

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

युनक्त सीरा वियुगा तनध्वं कृते योनौ वपत इह बीजम् ।
गिरा च श्रुष्टिः सभरा: असत् नः नेदीयः इत् सृण्यः पक्वं आइयात् ॥

[ नागर नाडा;† ( बैल ) जुपा; ( शेत ) नागरा; ( फाडीरूपी ) योनीत बी पेरा. आमचे मंत्र भरघोस पीक प्रेरित करो. तयार पिकाला विळे लावा. ]

पुरूरवस् हा जरी स्त्रीसत्ताक बाह्लीकांच्या देवीचा पुत्र होता, तरी तो तिचा उत्तराधिकारी बनू शकला नाही. त्याला देशांतर करून काशी राज्याची राजधानी प्रतिष्ठान येथे जावे लागले व तेथली शासनकर्ती उर्वशी वा तिची मानवी प्रतिनिधी इच्याशी लग्न करावे लागले. यावरून अनुमान निघू शकते की इळेची उत्तराधिकारी तिची कन्या बनली असावी.

परशुरामाच्या ऐतिहासिक भूमिकेबद्दल सर्वथैव चुकीचे आकलन प्रचलित आहे. तो पितृसत्ताकतेचा एक सर्वात कडवा व क्रूर कैवारी असल्याचे निरपवाद-पणे मानले जाते. या प्रचलित धारणेची एहरेन्फेल्सने सुसंबद्धपणे मांडणी केली आहे—

'...... आर्य आक्रमकांच्या शेवटच्या लाटेचा प्रतिनिधी असलेल्या परशु-रामाने एतद्देशीय मातृसत्ताक सिंधु समाजांचा प्रतिकार चिरडून पितृसत्ताक तत्वाची अखेर विजयी प्राणप्रतिष्ठा केली... ...'[५८]

डांगे या कल्पनेशी सहीसही सहमत आहेत.[५९] परशुराम स्वतः राजा प्रसेनजित्‌ची कन्या क्षत्र रेणुका व भृगुगोत्रीय ब्रह्मन् जमदग्नि यांच्या देवविवा-हाचे फलित होता. महाभारत (१.६४.५,७) परशुरामाच्या निःक्षत्रियीकरणा-नंतरच्या अवस्थेचे खालीलप्रमाणे वर्णन करते—

तदा निःक्षत्रिये लोके भार्गवेन कृते सति ।
ब्राह्मणान् क्षत्रिया राजन् सुत–अर्थिन्योऽभिचक्रमुः ॥

[ राजा, भार्गव (परशुरामाने) हा (पृथ्वी–) लोक क्षत्रियविहीन केल्यानंतर संततीची कामना करणाऱ्या क्षत्रिय स्त्रियांनी ब्राह्मणांकडे धाव घेतली. ]

तेभ्यश् च लेभिरे गर्भं क्षत्रियास् ताः सहस्रशः ।
ताः सुषुविरे राजन् क्षत्रियान् वीर्यवत्तरान् ॥

[ राजा, ब्राह्मणांपासून गर्भधारणा झालेल्या हजारो क्षत्रिय स्त्रियांनी नंतर श्रेष्ठतम क्षत्रिय वीरांना जन्म दिले. ]

† 'नाडणे' हे क्रियापद कोणतेही औत– नागर, वखर, कोळपे, इ० नाड्याने, दोराने, बांधून सज्ज करायच्या अर्थी शेतकरी वापरतो.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

याचा स्पष्ट अर्थ हा होतो की परशुरामाने क्षत्र व ब्रह्मन् यांच्या देवविवाहाच्या स्त्रीसत्ताक कायद्याचे पुनरुज्जीवन केले.

परशुराम हा स्त्रीसत्तेचा कट्टर कैवारी होता हे दोन घटनांवरून निर्विवादपणे सिद्ध होते. परशुराम दोन सुप्रसिद्ध द्वंद्वयुद्धे लढला. पहिले झाले त्याच्या समनामी रामाशी, जो राजा दशरथाची महिषी कौसल्या इने ब्रह्मन् ऋष्यशृंगाशी नि–योग करून प्रसवलेला पुत्र होता. परशुरामाने रामाला, तो त्याची वधू भूमातेची पुत्री सीता इच्यासह अयोध्येला परतत असता, अडवले. परशुरामाने रामावर आरोप केला ( १ ७५.१२ )–

"अनुसृष्टं सुरैर् एकं त्र्य्–अम्बकाय युयुत्सवे ।
त्रिपुरघ्नं नर–श्रेष्ठ भग्नं काकुत्स्थ त्वया ॥"

[ "( विश्वकर्म्याने बनवलेल्या ) दोन धनुष्यांपैकी त्रिपुर–नाशक एक धनुष्य देवानी युद्धप्रिय त्र्यंबकाला दिले, आणि ते धनुष्य तू, नर श्रेष्ठा काकुत्स्था, भग्न केले आहेस." ]

रामाला द्वंद्वयुद्धाला आव्हान देत परशुराम म्हणाला (१.७५.२७,२९) –

"श्रुत्वा तु धनुषो भेदं ततोऽहं द्रुतम् आगतः ॥
योजयस्व धनुः श्रेष्ठे शरं पर–पुरञ्–जयम् ।
यदि शक्तोऽसि काकुत्स्थ द्वंद्वं दास्यामि ते ततः ॥"

[ "धनुष्यभंगाचे ( वृत्त ) ऐकून मी येथे वेगाने आलो आहे. ( माझ्या या ) महाधनुष्याला तू शत्रूची नगरे जिंकणारा बाण लाव. जर ते तू करायला समर्थ झालास, तर काकुत्स्था, मग मी तुझ्याशी द्वंद्वयुद्ध करीन." ]

रामाने मोडलेले धनुष्य मुळात रुद्रांचे, जनी त्रि-अंबेच्या ज्ञातीचे होते. राष्ट्री वाक् म्हणूनच १०.१२५.६ या ऋचेत घोषणा करते की रुद्रासाठी धनुष्याची प्रत्यंचा खेचणारी खुद्द तीच आहे. ते धनुष्य विदेहांचे राजे असलेल्या जनकांच्या घराण्याचा ठेवा होता ( १-६६.१२ ). ते स्त्रीसत्ताकतेचे प्रतीक होते व तेच रामाने मोडले.

हे जनक कोण होते ? जनकाचा शब्दशः अर्थ होतो प्रजोत्पादनात निमित्त-मात्र असलेला, ज्याचा पुढे अर्थ होऊ लागला पिता. ते एका व्यक्तीचे नाव नसून एका राजघराण्याचे नाव होते. ( १.७१.४ ) वैदिक कर्मकांड व अध्यात्म यांच्या पारंगततेबद्दल प्राचीन काळात प्रख्यात असलेल्या राजर्षींचा तो वंश होता. भूमाता ही विदेहांची मातृदेवता होती; कारण रामाने तिला सासू म्हणून संबोधले होते ( "...... श्वश्रूर् मम एव त्वं ...... ।" ७-९८-७ )

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

परंतु जनक जरी भूदेवीच्या मानवी प्रतिनिधीचा राजर्षी पती होता, तरी तो भूमातेची कन्या सीता इचा पितामात्र नव्हता. विश्वामित्र ऋषीला तिची जन्मकथा सांगताना खुद्द जनकच म्हणाला की, यज्ञकर्मासाठी त्याचे शेत नागरले जात असता ती त्या शेतातून निघाली ( १-६६-१३ ). ही अंतर्हित वास्तवतेचे उखाण्यात वर्णन करायची पद्धत आहे, या उखाण्याचा अर्थ होतो –सीता ही स्त्रीसत्ताक विदेहांची राष्ट्री वा भूदेवीची मानवी प्रतिनिधी व त्यांचा गोतम गोत्राचा ब्रह्मन् पुरोहित यांच्या देवविवाहातून जन्मली. गोतमचा अर्थ होतो सर्वोत्तम सांड. जनकांचे पुरुष राजपद स्त्रीसत्ताक व्यवस्थेवर अध्यारोपित झालेले असल्यामुळे त्याला क्षत्र–ब्रह्मन् देवविवाहाच्या मायाविधीची जपणूक करणे भाग होते; कारण तो विधी गण व निसर्ग यांच्या पुनरुत्पादनाची हमी असल्याबद्दलचा सार्वत्रिक विश्वास होता. पुरुष राजपदाच्या जनकसंस्थेची सुरवात विदेह गणाच्या राष्ट्रींनी पुरूरवस् व पेरुमालसारख्या परकीय राजपुत्रांना नियतकालिक पती करण्यातून झाली, आणि सीतेच्या– ज्याचा अर्थ राजाच्या मालकीची जमीन असाही होतो.[६०] उदयातून ही संस्था कायम व पितृवंशक झाली. राष्ट्र गणभूमीपासून तोडली गेलेली सीता ही पहिली खाजगी मालमत्ता होती. या मुद्याचे विस्ताराने विवरण पुढे करण्यात येईलच. जनकांनी विदेहांच्या मातृदेवतेची पुरोहिता अहल्या इला पदच्युत करून त्यांच्या नियतकालिक पुरुष राजपदाला चिरस्थायी केले. अहल्येचा शब्दशः अर्थ होतो नागराऐवजी स्पयने लागवडीला आणलेली जमीन, जे भूमातेचेच नाव होते हे उघड आहे. विश्वामित्राने जेव्हा राम व लक्ष्मणाला बरोबर आणले तेव्हा या मातृदेवतेची त्याच नावाने ओळखली जाणारी पुरोहिता विदेहांची राजधानी मिथिलेजवळच्या वाडीत राहात असून ( १. ४८. ११ ) दुराचरणामुळे शापित व परित्यक्त स्त्रीचे जीवन व्यतीत करीत होती. ती विदेहांचा पुरोहित शतानंदाची व तसेच सीतेचीही माता होती. जनकाने विश्वामित्राला सांगितले की सीता ही वीर्य-शुल्का आहे ( १. ६६. १४, १६ ). याचा अर्थ असा लावला गेला आहे की, तिची प्राप्ती त्र्यंबक धनुष्याला प्रत्यंचा चढवायच्या वीर्यकृत्याचे शुल्क अदा करूनच होऊ शकत होती ( १. ६६. १८–१९ ). पण वीर्याचा अर्थ रेत असाही होतो, आणि या अर्थातून सीता ही दाशांची राजकन्या काली व मल्लांची महिषी शीलवती यांच्यासारखी धर्मनटी होते. तिची आई अहल्या इला पितृसत्ताकतेने व तिच्या एका सर्वश्रेष्ठ कवी वाल्मिकीने अगोदरच 'दुर्वृता', 'दुष्ट-चारिणी' ( १. ४८. ३२, ३३ ) म्हणून बदनाम केलेले होते. अहल्यांचे घराणे जनकांशी नियतकालिक व स्त्रीप्रधान देवविवाह करी, व त्याचे




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शुल्क असे ज्या पुरुषाशी ती संगत होई त्याचे वीर्य. परंतु सीतेला तिच्या पतीच्या घरी रवाना करण्यातून स्त्रीप्रधान विवाहाचे त्याच्या विरुद्धात, पुरुषप्रधान विवाहात, रूपांतर करण्यात आले. राम विदेहांच्या स्त्रीसत्ताकतेचे जिवंत व सर्वश्रेष्ठ प्रतीकाला पितृसत्ताकतेचा बालेकिल्ला झालेल्या अयोध्येला घेऊन चाललेला होता. म्हणून परशुरामाने त्याला प्राणांतिक द्वंद्वयुद्धाचे आव्हान दिले. परंतु त्यात परशुरामाचा, व त्याच्याबरोबर स्त्रीसत्ताकतेचा, रामाकडून पराभव झाला ( १.७६ ).

परशुरामाने दुसरे द्वंद्वयुद्ध स्वतःच्या शिष्याशी, महाभारतातले एक सर्वांत प्रभावशाली पात्र असलेल्या कुलपति भीष्माशी, केले (५.१७३–१९२). पांडव–पतींबरोबर कौरवांची दास झाल्यानंतर दुःशासनाकडून कुरूंच्या गण-सभेसमोर नग्न केली जाणार असता द्रौपदीने विचारलेल्या प्रश्नाला भीष्माने जे उत्तर दिले त्यात त्याच्या सामाजिक दृष्टिकोनाचे सारसर्वस्व आहे ( २.६७.४७ )–

"न धर्म–सौक्ष्म्यात् सुभगे विवेक्तुं<br>
शक्नोमि ते प्रश्नम् इमं यथावत् ।<br>
अस्वाम्य् अशक्तः पणितुं परस्वं<br>
स्त्रियाश् च भर्तुर् वशतां समीक्ष्य ॥

[ " सुभगे, धर्माची ( कायद्याची ) सूक्ष्मता लक्षात घेता मी तुझ्या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर देऊ शकत नाही. माणूस स्वतःच्या मालकीची नसलेली वस्तु डावाला लावू शकत नाही ( हे जसे खरे आहे ), तसेच पतीचे ( तो कोणत्याही अवस्थेत असो ) स्त्रीवर स्वामित्व असते ( हेही तेवढेच खरे आहे )." ]

येथे हे लक्षात घेण्याजोगे आहे की द्रौपदी 'स्वतंत्र' पतीच्या त्याच्या पत्नीवरील स्वामित्वाविषयी शंका उपस्थित करीत नसून, अगोदरच दास झालेला पती त्याच्या पत्नीचे 'स्वातंत्र्य' पणाला लावू शकतो काय हा प्रश्न विचारीत आहे. भीष्म निःसंदिग्ध शब्दात सांगतो, की युधिष्ठिराने जरी जुगारात त्याचे स्वातंत्र्य गमावले असले, तरी द्रौपदीवरचे स्वामित्वमात्र त्याने गमावलेले नाही, आणि म्हणून 'दास' या नात्याने का होईना, तो त्याच्या पत्नीच्या स्वातंत्र्याची विल्हेवाट लावण्याइतका 'स्वामी' खचित आहे. भीष्माच्या म्हणण्याप्रमाणे द्रौपदी, त्याची नातसून, वा सर्वसामान्यपणे पत्नी, दासाची दासी होती !

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

परशुरामाचे भीष्माशी द्वंद्वयुद्ध कशातून उद्भवले? काशींच्या राजाला अंबा, अंबिका व अंबालिका नावाच्या तीन कन्या होत्या. ही तिन्ही नावे मातेची पर्यायवाची आहेत, किंवा काटेकोरपणे बोलायचे तर त्रियुत मातृ-देवतेची. त्या वीर्यशुल्का असल्यामुळे (५.१७४.२) त्या जेव्हा वयात आल्या तेव्हा काशींच्या राजाने त्यांचा स्वयंवरोत्सव योजून सर्व इच्छुक राजांना आमंत्रित केले. आपला सावत्र भाऊ विचित्रवीर्य याच्यासाठी सुयोग्य वधूच्या शोधात असलेला भीष्म या स्वयंवराला गेला, आणि आडवे आलेल्या सर्वांना पराभूत करून तिन्ही अंबांना बळजबरीने हरण करून घेऊन आला. हस्तिना-पुराला पोहोचल्यानंतर ज्येष्ठतम अंबेने भीष्माला सांगितले की, शाल्व देशाच्या (स्त्रीसत्तेची अभिजात भूमी) राजाला तिने अगोदरच मनाने वरलेले अस-ल्याने तिचा दुसऱ्याशी विवाह लावणे योग्य नाही. म्हणून भीष्माने तिची तिच्या प्रियकराकडे रवानगी केली. पण शाल्वाने तिला स्वीकारायचे नाकारले. आपल्या दुःखाचे कारण भीष्माला मानून तिने परशुरामाची मदत मागितली. परशुरामाने तिला कोणाकडे जायचे आहे, शाल्वाकडे की भीष्माकडे, असे विचारले, व आश्वासन दिले की दोघांपैकी कोणीही त्याच्या आज्ञेचा अवमान करायचे धाडस दाखवणार नाही. पण तिने पुनः पुन्हा आग्रह केला (५.१७७,३९)

"भीष्मं जहि महाबाहो यत्कृते दुःखम् ईदृशम्।"

"[महाबाहो, भीष्माला मार, जो माझ्या या (सर्व) दुःखाचे कारण आहे!"]

परशुरामाने मग तिला ब्राह्मण ऋषिवृंदासह कुरुक्षेत्रावर नेले व सरस्वती नदीच्या काठी मुक्काम करून भीष्माला बोलावणे पाठवले. शिष्याने केलेली पूजा स्वीकारून परशुरामाने त्याला पुनःपुन्हा बजावले (५.१७८.३०.३५.३६)

"तस्माद् इमां मन्-नियोगात् प्रतिगृह्णीष्व भारत ॥
न करिष्यसि चेद् एतद् वाक्यं मे नर-पुङ्गव ॥
हनिष्यामि सह-अमात्यं त्वाम्* अद्य इति पुनःपुनः।"

["म्हणून भारता, माझ्या आज्ञेनुसार इचा स्वीकार कर! जर मी सांगतो ते तू करणार नाहीस, तर, नरपुंगवा, तुझ्या (सर्व) बांधवांसह मी तुला ठार करीन," असे तो पुनःपुन्हा म्हणाला.]

---

* ४.२-१०४ या पाणिनीय सूत्रानुसार अमात्यचा अर्थ 'एका घरात राहतो तो' (अमा सह वसति।) असा होतो.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यापूर्वी काशी देशावर राष्ट्री उर्वशी राज्य करीत होती व ती पुरूरवस्-सारख्या परकीय राजपुत्रांशी नियतकालिक स्त्रीप्रधान विवाह करीत असे, हे आपण अगोदर पाहिलेच आहे. पुरूरवस्‌चा बाल्हीक देश व शाल्व देश शेजारी शेजारी होते, आणि मद्र, इ०सह स्त्रीसत्तेचा अभिजात प्रदेश म्हणून प्राचीन काळात प्रख्यात होते. या तीन अंबा राष्ट्री उर्वशीच्या वंशजा होत्या. काशीच्या क्षत्र व शाल्वचे ब्रह्मन् यांच्या देवविवाहांचा पुरातन पाश कायमचा तोडला गेला व काशींच्या स्त्रीसत्ताकतेची ही सर्वश्रेठ प्रतीके पुरुषप्रधान विवाहपाशात बांध-ण्याकरता गांगेय भीष्माकडून, पितृसत्तेच्या सर्वश्रेष्ठ वीराकडून बलपूर्वक हरण केली गेली.

परशुरामाने भीष्माला अंबेचा शाल्वाऐवजी स्वतः नियतकालिक धर्मपती बनायची आज्ञा केली, व अशाप्रकारे इतिहासाचे चक्र उलट, स्त्रीसत्ताकतेकडे, फिरवायचा प्रयत्न केला. हे द्वन्द्व युद्ध, परशुरामाने क्षत्रियांची कत्तल करून रक्ताची पाच तळी भरल्याने जे समंतपंचक म्हणून प्रसिद्धीला आलेले होते (१.२.४–११,३-११७.९–१०). त्याच कुरुक्षेत्रावर गुरुशिष्यांचे द्वंद्वयुद्ध झाले. स्त्रीसत्ताकतेचा सर्वश्रेष्ठ वीर पुन्हा पराभूत झाला.

पण अंबेने हार मानली नाही. तिने घोर तपश्चर्या आरंभली व तिच्या अर्धा शरीराची अंबा नावाची नदी झाली तरी ती बंद केली नाही (५.१८६. ३६–४१)–

'...... खडकांमधून कष्टसाध्य वाट काढत गेलेली, मगरांनी भरलेली व यात्रेकरूंना धोकादायक असलेली (दुस्तीर्था) ही नदी वत्स देशातून वाहते असे सांगितले गेले आहे. या सर्व तपशीलावरून ती गंगेच्या खोऱ्यातील अलाहाबादवरच्या सपाटीतील मातृदेवता अंबेचे प्रतिनिधित्व करणारी विद्यमान् नदी असावी असे दिसते......'[६१]

रुद्र या स्त्रीसत्ताकतेच्या दैवताकडून तिने पुढच्या जन्मी भीष्माला मारायला समर्थ बनवणारा वर मिळवला, व "भीष्म–वधाय" असे म्हणत अग्निप्रवेश केला (५.१८७.१९) –

'......अंबा आत्महत्या करते, पुनर्जन्म घेते वा पुनर्जन्मानंतर पुरुष शिखंडिन्‌मध्ये परिवर्तित होते, आणि आतापर्यंत अजिक्य असलेल्या भीष्माला अखेरीस युद्धात ठार मारते; कारण की तो स्त्रीशी, पूर्वजन्मी स्त्री असलेल्या पुरुषाशीही, लढू शकत नाही. मी येथे भर घालीन की शिखंडिन् हा शब्द, जो 'तुरा असलेला' या अर्थी मोराकरताही प्रयुक्त होऊ शकतो, तो अथर्ववेद

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

४.३७.७ मध्ये एका गंधर्वाचे नाव वा उपनाव म्हणून दिलेला आहे...... ज्या नदी देवतेला भीष्माने झिडकारले तिच्याकडूनच तो मारला गेला. त्याचा प्रतिद्वंद्वी पुरुषदेहधारी स्त्री होता हे विवरण समर्पक नाही.'[६२] (अपूर्ण)



संदर्भ —


१. ए० बी० कीथ, द वेद ऑफ ब्लॅक यजुस् स्कूल, हा० ओ० से०, खंड १९, पा० २७९.
२. दा. ध० कोसंबी, द कल्चर अँड सिव्हिलिझेशन ऑफ इंडिया इन हिस्टारिकल आउटलाइन, पा० ८२–८३.
३. जगदीश काश्यप (सं०), दीघनिकायपालि, सीलक्खन्धवग्ग, ३.४–५.
४. लक्ष्मण सरूप, निघण्टु अँड निरुक्त, पा० १७८.
५. जगदीश काश्यप ( सं० ), उक्त, ३-५-२१.
६. जगदीश काश्यप ( सं० ), संयुत्तनिकायपालि, ७-१२-१२.
७. जगदीश काश्यप ( सं० ), थेरगाथापालि, ५-३-३२५–३२९.
८. आर० ग्रिफिथ, हिम्स ऑफ द ऋग्वेद, खंड १, पा० ५४९–५५०.
९. डब्ल्यू० डी० व्हिटने, अथर्ववेद संहिता, पा० ६६३.
१०. ए. बी. कीथ, ऋग्वेद ब्राह्मणाज, हा. ओ. से., खंड २५, पा. ३४३.
११. वाजसनेयि संहिता, २३-२०.
१२. जातक ( हिंदी ), खंड ५, पा. २७५–२७६.
१३. जगदीश काश्यप ( सं. ), जातकपालि, ५२६-१.
१४. उक्त.
१५. उक्त, ५२६-४.
१६. जातक ( हिंदी ), खंड ५, पा. २८३.
१७. ए. के. कुमारस्वामी, स्पिरिच्युअल अँथॉरिटी अँड टेंपोरल पॉवर इन इंडियन थिअरी ऑफ गव्हर्मेंट, पा. १–२.
१८. उक्त, पा० ६१–६३.
१९. पद्मनाभ मेनन, हिस्टरी ऑफ केरळ, खंड २, पा. ३७४–३७६.


अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

२०. देवीप्रसाद चट्टोपाध्याय, लोकायत, १५९.
२१. उक्त, पा. ९६. ओ. आर० एहरेनफेल्स, मदर–राइट इन इंडिया, पा०. ६१.
२२. इरावती कर्वे, किनशिप ऑर्गनायझेशन इन इंडिया, पा. २३८.
२३. वासुदेव शरण अग्रवाल, इंडिया अॅज नोन टु पाणिनि, पा. ६८.
२४. जगदीश काश्यप ( सं. ) , मज्झिमनिकायपालि, २-३९-२-११
२५. उक्त, २-२८.
२६. पद्मनाभ मेनन, उक्त, पा. ३७४–३७६.
२७. ई. थर्स्टन व के. रंगाचारी, कास्ट्स अँड ट्राइब्स ऑफ सदर्न इंडिया, खंड ५, पा. ४०८–४११.
२८. इरावती कर्वे, उक्त पा. ३०४–३०५.
२९. उक्त, पा. ३०३.
३०. उक्त, पा. ३०४.
३१. ओ. आर. एहरेनफेल्स, उक्त, पा. ६१.
३२. इरावती कर्वे, उक्त पा. ३६६.
३३. जगदीश काश्यप (सं.), विनयपिटक, पाराजिकपालि, ४-२-२०–२१.
३४. इरावती कर्वे, उक्त, पा. २१४.
३५. उक्त, पा. २९४–२९५.
३६. उक्त, पा. २९७.
३७. उक्त, पा. २९६.
३८. उक्त, पा. २९७–२९८.
३९. उक्त, पा. २९६.
४०. ई. थर्स्टन व के. रंगाचारी, उक्त, पा. ३०९.
४१. रॉबर्ट ब्रिफॉ, द मदर्स, खंड १, पा. ७०१–७०२.
४२. इरावती कर्वे, उक्त, पा. ३०२–३०३.
४३. उक्त, पा. ३०३.
४४. उक्त, पा. ४१८.
४५. उक्त, पा. २९५,३०६–३०७.
४६. उक्त, पा. २९८.
४७. उक्त, पा. २९९.
४८. पद्मनाभ मेनन, उक्त, पा. ९१–९२,७०.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

४९. जगदीश काश्यप (सं.), दीघनिकायपालि, सीलक्खन्धवग्ग, ३.६.२२.
५०. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, ऋग्वेदाचे मराठी भाषांतर, पा. ३११.
५१. आर. फिक, द सोशल ऑर्गनायझेशन इन नॉर्थईस्ट इंडिया इन बुद्धाज टाइम, क. ७९–८१.
५२. जगदीश काश्यप ( सं. ), उक्त, पाथिकवग्ग, ४–३–२१.
५३. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, उक्त, पा. १७४.
५४. पां. वा. काणे, उक्त, पा. ४४७.
५५. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, उक्त, पा. ७१२.
५६. आर. ग्रिफिथ, उक्त, खंड २, पा. ५८२.
५७. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, उक्त, पा. ६९२.
५८. ओ. आर. एह्‌रेनफेल्स, उक्त, पा. १३४.
५५. श्री. अ. डांगे, इंडिया : फ्रॉम प्रिमिटिव्ह कम्युनिझम टु स्लेव्हरी. पा. १२५.
६०. दा. ध. कोसंबी, उक्त, पा. १४८.
६१. उक्त, मिथ, ॲन्ड. रिॲलिटी, पा. ६०
६२. उक्त.

---

## साभार पोच–

*** अमेय प्रकाशन, रुईकर पथ, नागपूर २.**

**१. कवडसे, शं. ना. नवरे, मूल्य रु. १५.**

**२. चाफा, देवाची आई, चिं. त्र्यं. खानोलकर, मूल्य रु. १२.**

**३. ज्ञानेश्वरांचे श्रोतृसंवाद, डॉ. द. भि. कुलकर्णी, मूल्य रु. १५.**

*** डॉ. ब. स. येरकुंटवार, रुईकर मार्ग महाल, नागपूर, २.**

**१. श्री ज्ञानदेवांचे अभिनवदर्शन, सं. ब. स. येरकुंटवार, मूल्य रु. १२.**

*** स्मरणिका, ५१ वे अ. भा. म. सा. संमेलन, कराड.**

*** युनिव्हर्सल प्रकाशन, कोल्हापूर.**

**१. वाङ्मयदर्शन, डॉ. पंडित आवळीकर, मूल्य रु. १२.**

**२. कॅप्टनची मुलगी, डॉ. पंडित आवळीकर, मूल्य रु. १०.**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. पुरुषोत्तम शेठ

# चारणकाव्य आणि बखर गद्य

---

आपली प्रियतम भारतभूमी तत्त्वचिंतकांची, श्रेष्ठ सरस्वती पुत्रांची भूमी म्हणून जितकी प्रसिद्ध आहे, तितकीच वीररत्नांची भूमी म्हणूनही ख्यातनाम आहे. रजपूत, मराठे, जाट, शीख, इत्यादी जातींनी आपल्या रक्ताच्या सिंचनाने या देशाचा इतिहास घडविला आहे. त्यांच्या रक्ताने या देशाच्या इतिहासात पराक्रमाचे तेजस्वी रंग तर कधी हौतात्म्यांचे उज्वल रंग भरले गेले आहेत. हा इतिहास केवळ ऐतिहासीक करारपत्रांनी, नामातवारीखानी, सुरक्षित ठेवलेला तर आहेच. परंतु या पराक्रमाला चिरंजीवित्व, चीरनवीनत्व देण्याचे काम राजस्थानातील चारणकवींनी आणि मराठ्यांच्या दरबारातील बखरनवीसांनीही केलेले आहे. एकीकडे वीरांच्या कथा आत्मसमर्पणाने लिहिल्या गेल्या आहेत. तर त्याच्या जोडीला ही भूमी जशी वीर प्रसवा आहे तशीच वीर-रसात्मक साहित्याचीही खाण आहे. असे हे साहित्य वाचल्यावर मनोमन वाटते.

वीरसाहित्य वाटेल त्या वेळेस आकस्मिकपणे लिहिले जात नाही. कोठल्या तरी समरप्रसंगानेच या साहित्याला प्रेरणा मिळते. लढाईच्या, युद्धाच्या, रण-भेरीच्या काळात भित्र्या माणसाच्या धमन्यांतही रक्त संचारावे अशी कविता आक्रमणाच्या काळात लिहिली जाते. वीरांना प्रोत्साहन देण्यासाठी आजच्या काळाप्रमाणे पूर्वीच्या राजांनीही तत्कालीन साहित्यिकांची मदत घेतली होती. राजस्थानात भाट, बंदीजन, चारण हे दरबारात ठेवले जात, तर मराठे सरदारांचे पदरी शाहीर असत. मात्र ही कविता केवळ पैशाच्या लोभाने लिहिली जात नसे. वीरांचा पराक्रम चारण कविता मोहून टाकत असे.

सूर भरौसे आपरै, आम भरोसे सीह
भिड दहुँ ए भाजै नही, नही मरण रौ बीह
भडा जिका हूँ भामणै केहा करु बखाण
पडिये सिर धड नह पडे कर वाहै केवाणां

( बाकीदास डि. मे. वीररस पृ. ११६ )

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'बांकीदास' हा चारणकवी सांगतो की शूरवीर आणि सिंह आपल्या विश्वासावर उभे असतात. संघर्ष जुंपल्यावर मागे फिरणे त्यांना माहीत नसते. मृत्यूचे भय त्यांना नसते. मस्तक तुटल्यानंतरही त्यांचे कलेवर जमिनीवर न पडता शीर तुटलेल्या कलेबराचे हात शत्रूशी तलवारीने सामना करीत असतातच. अशा वीरांची प्रशंसा कोणता कवी करणार नाही. राजस्थानचा इतिहास अशा असंख्ययुद्धकथानी, वीर पुरुषांच्या समर्पणाने भरलेला असल्याने राजस्थानात कोणत्याही भारतीय भाषेपेक्षा मोठ्या प्रमाणात वीरकाव्य निर्माण झाले आहे.

मुसलमानी राज्य स्थिर झाल्यानंतरही छत्रपती शिवरायांसारखे पराक्रमी पुरुष निर्माण होतातच. उत्तरेतला कवी भूषणराय छत्रपतीसमोर नतमस्तक झाला. तो म्हणतो शिवरायाने वेदांचे संरक्षण केले, पुराणांचा अर्थ सुरक्षित ठेवला.

> वेद राखे विदित पुराण राखे सारयुक्त
> हिंदूअनकी चोटी राखी, रोटी राखी हैं सिपाहिनकी
> राखो हिंदुआवी, हिंदुआनको तिलक राख्यो ।

— शिवाजी महाराजानंतर छत्रसालासारखा राजा या वीरकाव्याला प्रेरणा देऊन गेला. समोरचा वीरपुरुष युद्धवेदीवर जेव्हा आपले रक्त सांडतो, तेव्हा कोणताही कवी, कोणताही गद्यकार, आपली लेखणी म्यान करू शकत नाही. उलट त्याची लेखणी लोकांच्या मनात अग्निकणांना फुलवित असते. चारणकवीने लिहिलेले काव्य, व बखरनवीसानी लिहिलेले गद्य या दोहोंनी साहित्याच्या रूपात भावी पिढीकरिता त्यांच्या कालानुरूप असलेला इतिहास ठेव्याच्या स्वरूपात आमच्या हवाली केला आहे.

वीरकाव्य व वीरगद्याची मूळ प्रेरणा पाहिल्यानंतर राजस्थानातील चारणकाव्य व बखरगद्याची तुलना का केली ? हे स्पष्ट करणे महत्त्वाचे आहे. चारणकाव्य रजपूत जातीच्या आचार-विचारांचा, संस्कृतीचा जिवंत असा आरसाच आहे. तर मराठ्यांचे बखरगद्य मराठ्यांच्या सर्व गुणदोषांचा, चालीरीतींचा परिचय करून देणारा युद्धकथांचा वार्ताकोष आहे. दोघांच्या सृजनकाळात अंतर आहे. चारण कवींचे काळ इ. स. १००० ते १६०० पर्यंत विशेष लिहिले गेले. मग त्यांची गुंज क्षीण झाली. आणि याच वेळेस छत्रपती शिवाजी महाराजांचा उदय भारताच्या राजकीय क्षितिजावर झाला. मराठ्यांचे झेंडे अटकेपार गेले. पृथ्वीराजाप्रमाणे सदाशिवराव भाऊ हेही पराक्रमी होत्साते असूनही हरले. आणि याच काळात या वीरपुरुषांच्या रणांगणावरील



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पराक्रमाच्या हकीकती राजस्थानी चारणाप्रमाणे गद्यात बखरनवीसानी अमर करून ठेवल्या.

चारणकाव्य सुंदर अशा परुषवर्णी पद्यात लिहिले गेले तर बखर साहित्य गद्यात लिहिले गेले. चारणकाव्य आणि बखरगद्यात स्थान काळ, आणि माध्यमाचे व्यवच्छेदक अंतर असतानाही दोघांचे तौलनिक अध्ययन करणे औचित्याला सोडून नाही. कारण दोघांचा आत्मा वीरकाव्यांचा आहे. दोघांची रचना संघर्षकाळात झाली आहे. दोघानीही ( युद्धस्य वार्ता रम्या ) हे दाखवून दिले आहे. म्हणजे चारणकाव्य व बखरगद्यात नामरूपाचा भेद असेल परंतु त्यांची प्रकृती व आत्मा बराचसा परस्पराशी मिळताजुळता आहे. त्यांची चेहेरेपट्टी एक असून वीरस्तवनाची भूमिका आहे.

चारण कवीनी रणांगणात उभे राहून वीरांना प्रोत्साहन देणारी गीते जशी लिहिली तशीच प्रबंध काव्यातून अनेक राजवंशाच्या पराक्रमाचे स्तवन केले. या कवींच्या प्रबंधात्मक आख्यान काव्याला हिंदी साहित्याचे इतिहासकार 'रासो' म्हणतात– हिंदी साहित्याचा फ्रेंच इतिहासकार 'गार्सा द तासी' याने रासो काव्याची उत्पत्ती राजसूय यज्ञापासून मानली आहे. परंतु या उत्पत्तीचा कोणताही प्रामाणिक आधार ते देऊ शकले नाहीत. काही इतिहासकार 'रहस्य' या शब्दाशी संबंध जोडतात. परंतु तेही संयुक्तिक प्रमाण रासोंच्या उत्पत्तीसंबंधी देऊ शकले नाहीत. हिंदीचे विख्यात साहित्यिक इतिहासकार रामचंद्रशुक्ल चारण कवींपैकी 'नरपती नाल्ह' या कवीच्या 'बीसलदेव रासो'त 'रसायण' शब्द आला आहे. त्या "रसायण" शब्दापासून "रासो" ची व्युत्पत्ती झाली, असे सांगतात. परंतु याही व्युत्पत्तीला विशेष आधार नाहीत. विख्यात विद्वान आचार्य हजारीप्रसाद द्विवेदी जीनी "चरित्रबद्ध, छंदबद्ध, कथाबद्ध, चरित्रकाव्य म्हणजे रासो' असे म्हटले आहे. आचार्य हजारीप्रसादांची परिभाषः ही 'रासो' ग्रंथाची प्रकृती स्पष्ट करणारी आहे व येथेच बखर गद्याचे "रासो" शब्दाशी साम्य दिसून येते. बखर शब्दांचा व्युत्पत्ती अर्थ 'खबर' अगर हकीकत असा आहे. मोल्सवर्थ शब्दकोशात Any History Relation memoir in prakrit prose असे सांगितले आहे. मराठी शब्दरत्नाकरात 'बखर' म्हणजे गद्य इतिहास चरित्र असे म्हटले आहे. वि. वा. भिडे यांच्या सरस्वती कोशात 'बखर' ग्रंथाचा अर्थ "राजा किंवा महान पुरुषाच्या लढाईचे वर्णन करणारी रचना" असे केलेले आहे. महाराष्ट्र शब्दकोशात बखरशब्दाचा व्युत्पत्ति अर्थ सांगताना सांगितले आहे की, "देशी भाषेत लिहिलेला इतिहास अगर चरित्र म्हणजे बखर."



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वरील उदाहरणावरून, प्रमाणावरून स्पष्ट होईल की, बखर गद्य हे ऐतिहासिक वीरपुरुषांच्या चरित्रगाथा होत. आणि बखरीप्रमाणेच राजस्थानी रासोग्रंथ ही पराक्रमी पुरुषांच्या वीरगाथा होत. 'चंदबरदाईच्या' "पृथ्वीराज रासोत" "पृथ्वीराज चौहानच्या" पराक्रमाचे वर्णन आहे." "हमीर रासोत" चितौडच्या "वीरहमीरच्या" पराक्रमाची गाथा आहे तर सभासद विरचित बखरीमध्ये 'शिवाजी महाराजांचे चरित्र' आहे, तर चिटणीसांच्या सप्त प्रकरणात्मक चरित्रात त्यांनी "शिवछत्रपती संभाजी महाराज, राजाराम महाराज आदी भोसले घराण्याच्या राजांचे वर्णन केले आहे. तर राजस्थानातील कवी दालपतने 'खुमान रासो' मध्ये बाप्पा रावळपासून १७ व्या शतकापर्यंतच्या मेवाडच्या राजांच्या पराक्रमकथा काव्यबद्ध केल्या आहेत. तर मराठीमध्ये विनायक सोहनीने पेशव्यांच्या बखरीत पेशव्यांचे घराणे आणि त्या घराण्यातील पराक्रमी पुरुषांचा इतिहास अक्षरबद्ध केला आहे. तर राजस्थानीत जगनीकने" 'आल्हर' आणि 'उदल' या वीरांचा पराक्रम व पराभव हा प्रभावी भाषेत अमर केला आहे. पानिपतावर भाऊसाहेब पेशवे यांचा पराभव होऊनही त्या पराभूत परंतु विजयाचे स्फुरण यावे अशा प्रसंगाचे वर्णन 'कृष्णाजी शामरावाने' भाऊसाहेबाच्या बखरीत करून मराठी भाषेला एक ऐतिहासिक शब्दशिल्प दिले आहे. वरील उदाहरणावरून स्पष्ट होईल की, 'रासो' पद्यात "बखर" गद्यात असूनही स्थूलरूपाने दोघांचा वर्ण्यविषय कोणत्यातरी महान पराक्रमी पुरुषांच्या चरित्राचे वर्णन, कोणत्यातरी राजघराण्यातील पराक्रमी वीरांचा विजिगीषु इतिहास हाच या दोघांचा प्रमुख प्रतिपाद्य व वर्ण्य विषय होता. कालाचे अंतर, भाषाभेद असूनही चारणकवींच्या वीरगाथा आणि बखरनवीसांच्या वीरपुरुषांच्या पराक्रमाच्या हकीकती यांचा आत्मा एकच आहे. या दोन्ही ग्रंथाची प्रकृती वीररसाची आहे.

चारण कवी आणि बखरनविसांच्या व्यक्तिमत्त्वात आणि त्यांच्या प्रेरणातही खूप साम्य आहे. चारण व भाट बंदीजन, हे पूर्वीपासून राजाश्रयाने कविता करत राहिले. व "ब्राह्मण के मुख की कविता, कछु भाटलै, कछु चारणलिन्ही" ठाकूर किशोर म्हणतात 'चारण' हा शब्द संस्कृतच्या चर् धातूपासून निर्माण झाला आहे. क्षत्रियांचा क्षात्र धर्म जागविण्याचे कार्य राजस्थानात 'चारण' कवींनी केले. "लाख पसाव क्रोड पसाव" म्हणजे लाख रुपये अगर करोड रुपये हे चारणांना राज्यपुरस्कार म्हणून मिळत असे. परंतु असे चारणकवी फारच थोडे होते. हे चारण कवी रजपूत राजांचे खास सल्लागार, गुप्तयत्रणतही ते राजांना सल्लामसलत करण्यात मदत करीत असत. इतकेच नव्हे

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तर रणांगणात तलवार चालविण्याचे शस्त्रकौशल्यही त्यांच्याजवळ होते. बखरकारही चारणकवी प्रमाणे राजा जहागिरदार यांचे आश्रित होते. चारण कवीनी राजाज्ञेनुसार जसे काव्य लिहिले, तसेच बखरकारानीही राजा किंवा जहागीरदारांच्या विनंतीवरून "चरित्रग्रंथ' अगर 'युद्धवृत्तांत' लिहिले आहेत. कृष्णाजी अनंत सभासदकृत 'शिवछत्रपतीच्या' चरित्राच्या प्रारंभी लिहिले आहे.

"तुम्ही पुरातनराज्यातील माहितगार लोक आहात तरी इस्तकबील पासून' चरित्र लिहून देणे" (शिवछत्रपती, सभासद बखर पृष्ठ १) भाऊसाहेबांची श्रेष्ठ बखरही कृष्णाजी शामरावाने राजाज्ञेनेच लिहिली आहे. यावरून स्पष्ट होईल की, बखर किंवा राजस्थानी चारणकवींच्या काव्यांची प्रेरणा "स्वान्तसुखाय" बरोबर "स्वामिनःसुखाय" अशीही होती.

चारणकवी आणि बखरनवीस बहुश्रुत होते. रामायण, महाभारत, संस्कृत-काव्य शास्त्र आणि पुराणांचेही ज्ञान त्यांना होते. 'पृथ्वीराज रासो' लिहिणारा चंद बरदाई हा कवी 'षड्भाषा' व्याकरण आणि छंदःशास्त्रातही पारंगत होता. मराठी बखरी पाहता बखरनवीसही बहुश्रुत व्युत्पन्न पंडित होते असेच आढळून येईल.

बखरनवीस आणि चारण कवी गुण संकीर्तन करताना नेहमीच पुराणांच्या छायेखाली वावरताना दिसतात. तर सभासद शिवाजी महाराजांना शंकराचा अवतार मानतात. तर चिटणीसांनी प्रारंभातच म्हटले आहे (शिवछत्रपती) अवतार होऊन धर्मस्थापना केली. भाऊसाहेबाची कैफियत या बखरीत म्हटले आहे "नानासाहेब व भाऊसाहेब ईश्वरी अवतार धरून या युगी चरित्र केले" (भाऊसाहेबाची कैफियत पृष्ठ २६) यावरून स्पष्ट होईल की बखरकार आपल्या राजाना 'ईश्वरी' अवतार मानत होते. मात्र केवळ खोटी स्तुती चारणकवीनी अगर बखरकारांनी केली नाही. अकबराच्या दरबारात त्याच्या तोंडावर पृथ्वीराज हा चारण कवी म्हणाला –

"माई एहडा पूत जण, जेएडा राणा प्रताप
अकबर सूतो ओझकै, जाण सिराणै साँप"

हे माते राणाप्रतापासारख्या पुत्राला जन्म दे, ज्यांचे नाव ऐकताच अकबर दचकतो (डिंगल मे वीररस पृष्ठ ९१) अकबराच्या दरबारात फैरूसाजी" नांवाचे चारण कवी होते. अकबराच्या दरबारात त्यांनी आपल्या हिंदुत्वाचा अभिमान सोडला नाही. ते म्हणतात –


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अकबर गरब न ऑण, हींदू सल चाकर दुबां
दीठी कोई दीवाण, करतो लटका कटह है ॥

चिटणीसांच्या शिवछत्रपती चरित्रातही भूषण कवीने शिव-प्रेमावरून औरंगजेबाला जे उत्तर दिले, त्यांचेही ऐतिहासिक वर्णन आपणास आढळते. चारण कवी व बखरनवीसांनी केलेली राजस्तुती अतिशयोक्तिप्रधान असेल. परंतु ही भक्ती अंतःकरणापासून आलेली असल्यामुळे बखर साहित्य व रासो साहित्य अकृत्रिम सहज, अभिव्यक्तीचे सौंदर्य टिकवू शकले.

## अनैतिहासिकता

चारणकवींच्या काव्यांची आणि बखरनवीसांच्या बखरगद्यांची ऐतिहासिकता संदिग्ध मानली जाते. कर्नल टॉडने पृथ्वीराज रासोच्या आधारावर लिहिलेला राजस्थानचा इतिहास चुकीचा होता. असे पंडित गौरीशंकर हीराचंद ओझा यांनी प्रतिपादन केले. ते रासोपद्याला कविकल्पना मानत. तर महाराष्ट्राचे इतिहासाचार्य राजवाडे सुद्धा म्हणतात "बखरी अस्सल प्रमाण नाही" ( राजवाडे खंड ४ पृष्ठ २९७ ते २९८ ) यावरून स्पष्ट होईल की बखरी आणि राजस्थानी रासो पद्य ऐतिहासिकतेच्या दृष्टीने संदिग्ध आहे. स्थल, काल, व्यक्तिविपर्यास, काल्पनिक कथांचा समावेश, पुराणशैलीचा प्रभाव यामुळे बखरगद्य आणि चारणकाव्य ऐतिहासिक सत्यतेच्या कसोटचावर उतरत नाही.

बखरकार व चारण कवींचे लेखनादर्श पुराण होते. पुराणात अतिशयोक्ती व अत्युक्तीला विशेष महत्त्व दिले गेलें होते. व त्यामुळेच आजच्या इतिहासाच्या स्वरूपापासून चारण काव्य व बखर गद्य दूर राहिले. बखरनवीस व चारणकवी आपल्या राजांना सूर्यवंशी, अग्निवंशी, सोमवंशी मानतात. अगदी 'मनू इक्ष्वाकु' घराण्यापर्यंत त्यांचा संबंध जोडतात. 'पृथ्वीराज विजय' या काव्यामध्ये जयनाक कवीने पृथ्वीराजाला "सूर्यवंशी" म्हटले आहे. तर हमीर रासोमध्ये हमीर राजाला "सूर्यवंशी" म्हटले आहे मराठी बखरगद्यात चिटणीसांनी शिवछत्रपतींच्या सप्त प्रकरणात्मक चरित्रात कलियुगातील राजवंश नामक प्रकरणात शिवाजी महाराजांना "सोमवंशी" म्हटले आहे. तर तंजावरच्या भोसला वंश चरित्रात शिवाजी महाराजांना "सूर्यवंशी" म्हटले आहे. शिवाजी महाराजांवर लिहिल्या गेलेल्या प्रत्येक बखरीत शिवाजी महाराजांचा संबंध चितौडच्या सिसोदिया वंशाशी जोडण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. वंशावळीचा इतिहास हा चारणकाव्य व बखर गद्यावरील पुराणांचा प्रभाव स्पष्ट दाखवितो.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संयोगिता स्वयंवराची कल्पना अनैतिहासिक आहे. रासोमध्ये आलेली विवाह-वर्णने इतिहासाला धरून नाहीत.

बखरीप्रमाणेच पुराणांचा प्रभाव रासोपद्यावरही आढळतो. शिवाजी महाराजांच्या मृत्युप्रसंगी भगवान शंकराचे विमानाने तळ्यातल्या पाण्याचे रक्त होणे; भूकंप होणे, आदी प्रसंग बखरीवरील पुराणाचा प्रभाव दाखवितात. चारण कवी आणि बखरनविस यांचेवर असलेल्या पुराणांच्या प्रभावामुळे चारण काव्याला व बखरगद्याला इतिहासकाराची वस्तुनिष्ठ दृष्टि आली नाही. पुराणांच्या प्रभावामुळे चारणकवीचे काव्य आणि बखर साहित्य इतिहासाच्या आधुनिक, सत्य, कार्यकारण विश्लेषण, निष्कर्ष, वस्तुनिष्ठ दृष्टी, या पद्धती-पासून दूर राहिले. त्यामुळेच राजवाड्यांसारखे इतिहासकार, ऐतिहासिक सत्याच्या दृष्टीने बखरीना महत्त्व देत नाहीत. तर राजस्थानचे इतिहासकार, गौरीचंद, हिराचंद ओझा रासो साहित्याला 'डेमली' ( खोटे ) साहित्य मानतात. कर्नल टॉडने राजस्थानी चारण कवींच्या काव्यांच्या साह्याने, राज-स्थानचा इतिहास लिहिला; तर "ग्रँट डफने बखरीच्या साह्याने मराठ्यांचा इतिहास लिहिला; व हे दोन्ही इतिहास आज थोडेसे संदिग्ध मानले जातात.

चारण कवींचे रासोग्रंथ, आख्यान, आणि प्रबंध स्वरूपाचे आहे. विवाह, युद्ध, शिकार आदी वर्णनाची रेलचेल त्यात आहे. पृथ्वीराज रासोमध्ये पृथ्वी-राजाच्या सात विवाहाचे वर्णन आढळते, बखरीसुद्धा याला अपवाद नाहीत. शिवाजी महाराजांच्या संबंधी लिहिल्या गेलेल्या प्रत्येक बखरीत त्यांच्या राज्या-भिषेकाचे आणि विवाहाचे वर्णन आढळते. पेशव्यांच्या बखरीत सवाई माधव-रावाचे लग्न व लग्नानिमित्त झडलेल्या मेजवान्या यांचे रसभरीत वर्णन आहे. रंगपंचमी आणि होळीचा रंगही बखरीत उडविलेला दिसतो.

प्रबंध काव्याला, आख्यानकाव्याला, आवश्यक असणारी नाट्यात्मकता व बखर व चारण कवींच्या काव्यात आढळते. 'जोधराजा' च्या 'हमीर रासो' मध्ये हमीर राजाची माहीमशहाच्या बेगमाबरोबरच मुलाखत-उंदरामुळे अल्लाउद्दीनाची बेगमांनी चेष्टा करणे–अल्लाउद्दीन माहीमशहावर नाराज होऊन त्याच्यावर चढाई करतो. माहीमशहा प्राण वाचविण्यासाठी हम्मीर राजाचा आश्रय घेतो– वचन पालनासाठी हम्मीर आत्मसमर्पण करतो. ही पूर्ण कथा अगदी नाट्यमय पद्धतीने, शृंखलाबद्ध स्वरूपात जोध राजाने दिली आहे. कृष्णाजी सभासद अनंताने आपल्या शिवचरित्रात शिवाजी महाराजांच्या दोनशे त्रेचाळीस, प्रसंगांपैकी एकाहत्तर प्रसंग निवडून नाट्यमय

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पद्धतीने सभासद बखरीत, शिवचरित्र, चितारले आहे, तर कृष्णाजी शामरावाने "प्याद्याचा फर्जी" नजिबखान रोहिला होऊन दक्षिणदेशी हिंदुपद राजा श्री शाहू छत्रपती यांचा प्रधान आदी करून सव्वा लक्ष फौजेनिशी भाऊगर्दीहून, "प्यादे मात कैसी जाली ?" अशी सुरवात करून या बखरनवीसने पानिपतापूर्वीच्या राजकारणाची पार्श्वभूमी वर्णन करून पानिपतावरील प्रसंग व राजकारण युद्ध वर्णन यांचे सरस स्वरूप चितारून बखरीच्या शेवटी लिहिले आहे" नजिबखान प्यादा होता तो फर्जी जहाला त्याने प्यादेमात केली या प्रमाणे जाली हकीगत सेवेसी लिहिली" यावरून स्पष्ट होईल की बखरकार व चारण कवी एक सूत्र पकडून कीर्तनकाराच्या पद्धतीने कथेचा पूर्वरंग, उत्तररंग आख्यानात्मक पद्धतीने रंगवून, सुसंबद्ध अशी पद्याची व गद्याची रचना आपल्या समोर प्रस्तुत करतात.

## युद्धाची सजीव वर्णने

चारण कवींच्या काव्याचा आणि बखरकारांच्या गद्याचा वर्ण्य विषय ऐतिहासिक, चरित्र. आणि त्यांचा पराक्रम असल्यामुळे युद्धाची सजीव वर्णने दोघातही आढळतात. चारण कवी लेखणी इतकीच बंदुकही उचलीत व बखरकारही युद्धात प्रत्यक्ष भाग घेत. त्यामुळे त्यांची युद्धवर्णने एकाप्रकारे त्यांचा 'आखो देखाहाल' असल्यामुळे सजीव, जिवंत बनले आहे. युद्ध ही त्यांची प्रत्यक्ष अनुभूती असल्यामुळे चारण काव्य आणि बखर गद्य वाचत असताना वीरांच्या ललकाऱ्या, तलवारीचा झंकार, धनुष्याचा टणत्कार प्रत्यक्ष आपणास ऐकू येतो. पृथ्वीराज रासोतील एक युद्धवर्णन वानगीदाखल पहावे—

मचे छूह कूह बहै सारं सारं
चमक्कै चमक्कै भरारं सुधार ।
भभक्कै भभक्कै बहै रत्त धारं
सनक्कै, सनक्कै बहे बान भारं ।
हबक्कै, हबक्कै बहै सैल भेलं
हलक्कै हलक्कै मयो ठेल ठेलं ।
कुकै कूक फूटी सुरतान ठानं
बकी जोम माया सुरं अप्प थानं ॥

(सगळीकडे कोलाहल माजला, तलवारी चमकू लागल्या, खळखळ शब्द करीत रक्ताच्या धारा वाहू लागल्या, बाणांचे समूह सणासण चालू लागले, भाले घुसून त्वरित निघू लागले) भाऊसाहेब पेशव्यांच्या बखरीत

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आलेले एक युद्धवर्णन याच तऱ्हेचे आहे. जयाजी शिंदे जेव्हा मारवाडावर आक्रमण करतो तेव्हाची एक झलक पहा. "जोपर्यंत अंगाशी अंग लागले नव्हते तोवर तोफांचा मार व हस्तनाले, सुतरनाले व जेजारा व रेखले व गंजीफिर्यांच्या गाड्या व बरकंदाज अशी एकदाच सरबत्ती जाहली व बाणांचा वर्षाव मेघमालांप्रमाणे जाहला. झुंझात धुराची व धुळीची एकदाच गर्दी, धुंदी जहाली. कोणाचे तोंड, कोणाचे दृष्टीस पडेनासे जाहले. यंत्राच्या धडाकीच्या खाली घोडी मनुष्ये बदीर जाहली... ऐसी आग जाहाली नंतर आगी मार राहून तरवारीची खणाखणी जाहली– मोठमोठे खेतास येऊन मोठा प्रलय जाहाला... जैसा मोटेचा बैल सरतो तैसे मारच खात मुर्दे सांभाळून दोन कोस माघारे निघून गेले." पृथ्वीराजा रासोतील युद्धवर्णन व बखरीतील युद्धवर्णन यांची जातकुळी एकाच प्रकारची आढळते. चारण काव्य आणि बखर गद्यातील युद्ध वर्णन, "युद्धस्य वार्ता रम्या" ही उक्ती आपल्या वर्णनशैलीने सार्थ ठरवितात.

साहित्यदर्पणकारानी "उत्तम-प्रकृति-वीर:" असे लक्षण सांगून वीर रसाला अन्य रसाहून श्रेष्ठ ठरविले आहे. साहित्यदर्पणकाराचे हे कथन विवाद्य असले तरी चारण कवीचे काव्य आणि बखर गद्याच्या बाबतीत सर्वार्थाने खरे आहे. चारण कवि व बखरकार केवळ लेखणीबहाद्दर नव्हते तर तलवार बहाद्दरही होते. त्यामुळे त्यांचे काव्य वीररसाच्या व अनुभूतीच्या मुशीतून निघाल्यामुळे रसोत्कट आणि भावनोत्कट झाले आहे. वीररसाला आवश्यक असणारे, गर्व, स्मृती, तर्क, उत्साह आदी संचारी भाव चारण कवीच्या काव्यात आणि बखरनवीसांच्या गद्यात ओळी ओळीत आपणास आढळतात. पृथ्वीराज चौहानच्या दरबारातील एका प्रसंगाचे वर्णन पहा. किंवा बिसलदेव रासोमध्ये चारण कवी म्हणतात :

"बरस आठर क्षत्रियजीयै, बारह बरस जियैकूकर
तेरह बरसलियै जियै शूकर आप्त बरस क्षत्रिय जी यै
आगे जीवनको धिक्कार"

या ओळी मधून वीर रसाला आवश्यक असणारा ओजभाव, दर्पभाव आपोआपच व्यक्त होतो. भाऊसाहेबांच्या बखरीत दत्ताजी शिंदे जेव्हा "बचेंगे तो और भी लढेंगे" म्हणतो तो प्रसंग किंवा बळवंतराव मेहेंदळ्यांच्या मृत्यु व लढाईचा प्रसंगही वीररसाचे कारंजे उडवितो. शृंगार व अन्य रस साह्यक स्वरूपात येतात. मात्र वीररसांपुढे अन्य रस फिके पडतात.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चारण कवी व बखरकारांच्या काही समानधर्मी लेखनविशेषांकडे आपण संक्षेपाने पाहिले. तर आपणास असे आढळून येईल की वीर काव्यांच्या व वीर गद्याच्या काळात जरी अंतर असले तरी त्यांची प्रकृती जवळजवळ एकाच प्रकारची असते. भारतीय साहित्याचा जेव्हा जेव्हा इतिहास लिहिला जाईल तेव्हातेव्हा चारणकवीचे वीर काव्य आणि बखरकारांचे ओजपूर्ण गद्य यांच्या-साठी वीर साहित्य या नांवाने स्वतंत्र प्रकरणच लिहावे लागेल.



प्राज्ञ प्रकाशन

प्राचीन मराठी साहित्यावरील संशोधनपर विविध लेखांचा संग्रह

संशोधन-साधना

लेखक :

डॉ. वसंत स. जोशी

मूल्य रुपये बारा फक्त : ( पृष्ठे १९४ )

"मराठी वाङ्मयाच्या इतिहासामध्ये या "संशोधन साधने'ने लक्षात भरण्यासारखी निखालसपणे भर टाकली आहे. 'ही गोष्ट मराठी वाङ्मयेतिहासज्ञांच्या' लक्षात आल्याशिवाय राहणार नाही."

– तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ( प्रास्ताविक )

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. अशोक चौसाळकर

# प्राचीन भारतीय गणराज्यांतील वर्णव्यवस्था : काही विचार

---

प्राचीन भारतीय गणराज्यांमध्ये लोकशाही मर्यादित स्वरूपाची होती आणि तिचे लोकशाही स्वरूप फक्त राज्यकर्त्या राजन्यांपुरतेच मर्यादित होते हे आपण मागील लेखात पाहिले. ( प्राचीन भारतीय गणराज्ये काही विचार— नवभारत जुलै १९७५ ) या लेखात प्राचीन भारतीय गणराज्यांतील वर्णव्य-वस्थेचा आपण विचार करणार आहो, त्याच अनुरोधाने प्राचीन भारतीय विचार-परंपरेत लोकवादाला कितपत स्थान होते याचा पण विचार आपण करणार आहो.

प्राचीन भारतीय गणराज्यांची परंपरा लोकवादाची नाही. भारतीय गण-राज्यवादाला राजकीय तत्वज्ञानाचे स्वरूप कधीच प्राप्त झाले नाही. त्यातून जिवंत जीवनोन्मुख तत्वप्रणाली निर्माण न होता, लोकविरोधी, परंपराप्रेमी, प्रतिगामी कुलपरंपरेची जोपासना करणारी स्थितिवादी विचारप्रणाली निर्माण झाली. भारतात लोकवादाची परंपरा आहे काय हा पण एक महत्वाचा प्रश्न आहे. कारण प्रत्येक भारतीयकल्पना वर्णकल्पनेशी जखडलेली आहे. तत्वज्ञानाच्या क्षेत्रात प्रत्येक व्यक्ती हा एक घटक कल्पून भारतात अध्यात्मवादाने बरीच प्रगती केली. पण ही कल्पना राजकीय व सामाजिक विचारांच्या संदर्भात कधीच वापरली गेली नाही. प्राचीन भारतीय गणराज्ये लोकशाहीराज्ये असणे शक्य नव्हते. कारण लोकशाहीची कल्पना पश्चिमेमध्ये चार शतकांच्या महान् तात्विक चळवळींचे फळ आहे. त्यासाठी समाजातील एका वर्गाने लढे दिले. दरडोई मताधिकाराची काटेकोर अंमलबजावणी या शताब्दीत सुरू झाली. इंग्लंडमध्ये १९२८ पर्यंत व अमेरिकेत १९१८ पर्यंत महिलांना मते द्यावयाचा अधिकार नव्हता ! परंतु तात्विक दृष्टया तेथे लोकशाहीची कल्पना विकसित झाली होती.

अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नैसर्गिक अधिकार, नैसर्गिक कायदा, सामाजिक न्याय, वैश्विक बंधुभाव, समानता, स्वातंत्र्य, सत्ताविभाजनाचा सिद्धांत, जनतेचे अधिकार ह्या कल्पनांचे समर्थन तीन शतके आधीपासून केले जात होते. प्राचीन समाजांमध्ये जेथे गुलामगिरी हा अर्थव्यवस्थेचा कणा होता. ह्या कल्पनांचा विकास झाला असला तरी त्याची अंमलबजावणी झाली नाही. ग्रीकांनी व रोमनांनी जनतेचे कांही अधिकार मान्य केले. रोममध्ये नागरिकांनी सतत लढून कांही महत्वाचे अधिकार संपादन केले. ग्रीसमध्ये पण गुलामांनी सतत बंड करून काही मानवी अधिकार मिळविले. प्राचीन समाजाच्या संदर्भात लोकवाद हा मानवतावाद ठरतो. कारण त्या काळात लोकशाही कल्पनेचा, तिच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीच्या पद्धतींचा फारसा विकास झालेला नव्हता. प्राचीन समाजात सर्वसाधारण श्रमजीवी जनतेचे, शेतकऱ्यांचे, गुलामांचे अधिकार किती प्रमाणात पुरस्कारण्यात आले– तात्त्विक दृष्ट्या तरी– ह्यावर तेथील लोकवादाचे स्वरूप ठरवावे लागेल. प्राचीन भारताच्या संदर्भात लोकवाद म्हणजे बहुसंख्य वैश्य शूद्रांना त्यांचे मानवी अधिकार मिळावे म्हणून झालेले प्रयत्न हा होय. प्रथम आपण भारतात निर्माण झालेल्या अवैदिक विचारसरणींनी शूद्रांच्या मानवी अधिकारांचे कितपत समर्थन केले हे पाहू आणि नंतर प्राचीन भारतीय गणराज्यांतील वर्णव्यवस्थेच्या व अर्थ व्यवस्थेच्या संदर्भात लोकवादाचा विचार करू.

गौतमबुद्धाचा बौद्धधर्म मानवतावादावर उभा असल्याचे सांगतात. पण गौतमाने कधीही वर्णव्यवस्थेचा धिक्कार केला नाही. त्याने ब्राह्मणांच्या वर्चस्वाचा धिक्कार केला. वर्ण गुणांवरून ठरतो हे सांगितले पण वर्णकल्पनेचा त्याग त्याने कधीही केला नाही. सर्वसाधारण मानवतावादाचा त्याने पुरस्कार केला पण शूद्रांबाबत त्याने कधी ब्रही काढला नाही. गौतम बुद्धाचे समर्थक क्षत्रिय राजे आणि श्रीमंत वैश्य होते. गौतम त्यांचा पाहुणचार झोडत असे. बुद्धाचे संघ हेच क्षत्रिय राजे व श्रीमंत वैश्य. शूद्रांच्या श्रमातून निर्माण झालेल्या अतिरिक्त धनाच्या साह्याने पोशीत होते. कारण बुद्धभिक्षु स्वतः काहीच काम करीत नव्हते. बुद्धाने सर्वांना धर्मसंघात प्रवेश दिला पण गुलामांना जे त्यांच्या मालकांपासून पळून आलेले आहेत. अशांना प्रवेश नाकारला आहे. बुद्धाचे तत्त्वज्ञान हे निराशावादी तत्त्वज्ञान आहे. त्यातून ठोस समाजप्रवण तत्त्वज्ञानाची अपेक्षा करणेच चूक होते. जैनांचे तत्त्वज्ञान तर जास्तच निराशावादी आहे.

लोकवादी तत्त्वज्ञानांची अपेक्षा लोकायतांकडून होती. चट्टोपाध्याय म्हणतात की लोकायतांचे तत्त्वज्ञान हे लोकांचे तत्त्वज्ञान होते.[1] लोकायतांनी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ब्राह्मणांची निंदा केली. त्यांच्या दंभाचा व वेदांच्या अपौरुषेयत्वाचा त्यांनी अस्वीकार केला. त्यांच्या स्वभाववादाने कर्मकल्पनेचे खंडन केले पण हा बुद्धिवादी स्वभाववाद सामाजिक व राजकीय विचारांच्या संदर्भात वापरला गेला नाही. त्यांचा तर्कशुद्ध जडवाद भोगवादात ( hedonism ) आणि तुच्छतावादात ( cynicism ) परिवर्तित झाला. त्याचे सामाजिक व राजकीय तत्त्वज्ञान बनले नाही. प्राचीन भारतीय अर्थशास्त्रज्ञ ( अर्थशास्त्र याचा अर्थ प्राचीन भारतात Economics हा नव्हता. राज्यशास्त्राला प्राचीन भारतात अर्थशास्त्र म्हटले जात असे) लोकायतांचे शिष्य होते आणि तर्कशास्त्र व आन्वीक्षकी यात ते पारंगत होते. ते सतत श्रमंतीवर असल्यामुळे बहुश्रुत होते. पण त्यांचे राजकीय तत्त्वज्ञान कठोर अमानवी, अनैतिक आणि कुटील होते. भोगवादाची आणि तुच्छतावादाची परिणती अशाच प्रकारच्या अनैतिक तत्त्वज्ञानात होत असते. अर्थशास्त्रज्ञानी पण राजाला वर्णव्यवस्थेचे संरक्षण करण्याचे सांगितले ! लोकायतांचे किंवा अर्थशास्त्रज्ञांचे तत्त्वज्ञान म्हणूनच कधी सामाजिक व अर्थपूर्ण बनू शकले नाही. त्यांचा ब्राह्मणविरोध बौद्धिक होता आणि तळातील लोकांविषयी त्यांना फारशी सहानुभूती पण नव्हती. त्यांनी वर्णव्यवस्थेचा धिक्कार केला पण सर्वांना समान राजकीय अधिकार मिळावेत ही मागणी कधी केली नाही.

डी. चट्टोपाध्याय सांख्यांना जडवादी मानतात [२] व डॉ. वॉल्टर रूबेन यांच्या मते महाभारतात सांख्य तत्त्वज्ञानाने भारतीय विचारांना एक सामाजिक दृष्टिकोण दिला जो गीतेमध्ये व्यक्त होतो. [३] परंतु महाभारत कालातच सांख्यांचे जडवादी तत्त्वज्ञान अध्यात्मवादात परिवर्तित करण्यात आले. सांख्यांची गुणकल्पना मनाच्या तीन अवस्था दर्शविण्यासाठी प्रथम उपयोगात आणली जात होती. परंतु महाभारतातच त्या कल्पनेला सामाजिक अर्थ देण्यात आला. वर्णकल्पनेला गुणकल्पनेचा तात्त्विक आधार मिळाला. गीता ( भीष्म ४२.४१) सांगू शकली की गुण व कर्माच्या आधारे चातुर्वर्ण्याची निर्मिती करण्यात आली आहे. वर्ण व कर्मकल्पनेचे उदात्तीकरण करण्यासाठी ह्या तत्त्वज्ञानाचा वापर करण्यात आला.

वरील तीनही प्रगतिशील विचारप्रणालींचे पाय वर्णव्यवस्थेत रुतलेले दिसतात. ब्राह्मणांनी कधीही समानतेचे समर्थन केले नाही. वर्णव्यवस्थेला प्राचीन भारतात राज्यसंस्थेपेक्षा जास्त महत्त्वाचे स्थान देण्यात आले. बृहदारण्यकोपनिषदात ( १. ४. ११. १५ ) राजाने वर्णव्यवस्थेचे संरक्षण करावे हा त्याचा धर्म आहे हे सांगितले आहे. नंतर धर्मसूत्रकारांनी व धर्मशास्त्र-

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कारांनी सांगावयास सुरुवात केली की समाजव्यवस्थेचे जतन करणे, प्रत्येकाला स्वधर्म पालण्यास लावणे व विविध वर्णांचा संकर न होऊ देणे हे राजाचे महत्त्वाचे कर्तव्य आहे. ब्राह्मणांनी सहसा राजसत्तेशी वैर केले नाही. अश्वमेधासारखे राजांना आक्रमणाची चिथावणी देणारे यज्ञ करावयास लावण्यात व दक्षिणा उकळण्यात त्यांचा सारा वेळ गेला.

वर्णव्यवस्थेचे किंवा जातिव्यवस्थेचे बीज हरप्पा संस्कृतीपर्यंत मागे शोधता येऊ शकते. आर्यांच्या आगमनानंतर हरप्पा संस्कृती हळू हळू नष्ट झाली. आर्य निरनिराळ्या टोळ्यात विभागले होते. पशुपालन करून, लढाया करून त्यावर मिळणाऱ्या लुटीवर ते रहात असत. परंतु नंतरच्या काळात त्यांनी सुपीक नद्यांच्या खोऱ्यात वस्ती करावयास सुरुवात केली. सर्व भारतभर लहान लहान राज्ये होती. लोखंडाचा शोध लागला. लढाईत मिळालेले युद्धकैदी गुलाम म्हणून राबविण्यात येऊ लागले. त्यातून निर्माण झालेले अतिरिक्त धन बाजारात जाऊ लागले आणि व्यापाऱ्यांचा नवा वर्ग निर्माण झाला. लोखंडामुळे जंगल तोडणे सोपे गेले. नव्या लागवडीस आणलेल्या जमिनीतून अतिरिक्त उत्पन्न काढण्यासाठी स्वस्त मजुरीची गरज असते, आणि मजूर लढाईत काबीज केलेले युद्धकैदी व रानटी, भटके लोक यांच्यामधूनच भरती केले जात. जनपदराज्यांचा याच पद्धतीने विकास झाला. गणराज्यात व नृपराज्यात ह्याच प्रकारची पद्धत अमलात आणली गेली. स्वस्त मजुरीसाठी राजांना स्वायत्त गणांचा नाश करून त्यांना शेतावर पाठविणे आवश्यक बनत चालले होते. डी. चट्टोपाध्याय लिहितात. " रानटी गणांच्या संघटना तोडण्यात आल्या. त्यांना शेतीवर उपजीविका करणाऱ्या स्वायत्त खेड्यात वसविण्यात आले. हे धोरण फक्त एकाच राजाने अवलंबिले नाही तर किती तरी शतके आधीपासून याचा अवलंब केला जात होता. "[४] यामुळे सर्व थरात प्रचंड खळबळ निर्माण झाली. निरनिराळ्या टोळ्यांचे एकमेकाशी संबंध आले. त्यातूनच जनपदांनी भौगोलिक व प्रादेशिक अस्तित्व ग्रहण केले. डॉ. कोसंबी म्हणतात की " कृषीवर आधारलेल्या ग्रामीण अर्थरचनेची रानटी गणांवर मात ही भारतातील पहिली महान सामाजिक क्रांती आहे. ह्या सामाजिक क्रांतिमुळे संपूर्ण भारताचे स्वरूप बदलले. अर्थव्यवस्था शेतीच्या आधारावर उभी राहिली. अतिरिक्त उत्पादन बाजाराची वाट चालू लागले आणि व्यापाऱ्यांचा वर्ग उदयास आला. "[५]

जनपदराज्ये गणराज्यांच्या प्रयोगासाठी आदर्श राज्ये होती. मगध कोसल देशांनी अतिरिक्त उत्पन्नाचा उपयोग प्रचंड खड्या फौजा उभारण्यासाठी केला. बिंबिसार अजातशत्रूने सुरू केलेल्या राज्यविस्ताराला महापद्माने पूर्णतेस नेले.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नंतर मौर्यांनी संपूर्ण भारतभर आपले एकछत्री साम्राज्य प्रस्थापित केले. त्यांनी नव्याने लागवडीस आणलेल्या जमिनीतून येणाऱ्या अतिरिक्त उत्पादनावर मौर्यांची नोकरशाही उभी होती. डॉ. रोमिला थापर लिहितात "ह्या प्रदेशातील जंगले कापून काढण्याचे आणि नव्या वसाहती वसविण्याचे काम शासकीय यंत्रणेमार्फत होत असे. दाट लोकसंख्या असलेल्या भागातून बळजबरीने शूद्रांची त्या भागात रवानगी करण्यात आली. अर्थशास्त्रात ह्याचे तपशीलवार विवेचन करण्यात आले आहे. कलिंग युद्धात काबीज केलेले दीडलाख युद्धकैदी ह्या जमिनीची लागवड करण्यासाठीच पाठविले गेले असले पाहिजेत. यात शंका नाही. ह्या लोकांना शस्त्रे वाळगण्याचा अधिकार नव्हता. शेती हा त्यांचा एकमेव व्यवसाय– अतिरिक्त धान्य सरकार हिसकाहून घेत असे. अशाप्रकारे शूद्रांना सरकारच्या नियंत्रणाखाली आणले गेले त्यामुळे मोठ्या प्रमाणात गुलामी गरज राहिली नाही. परंतु खरे पाहिले असता शूद्र व गुलाम यांच्यामध्ये काहीच फरक नव्हता. परंतु कायद्याप्रमाणे शूद्र गुलाम नव्हते."[६]

गणराज्यातील गणसभेवर सत्ताधारी गणांचे वर्चस्व होते. डॉ. जयमल राय यांनी गणराज्यातील अर्थव्यवस्थेचे तीन काळात विभाजन केले आहे. डॉ. राय लिहितात "वैदिक काळात सर्व चल संपत्ती गणांच्या मालकीची असे, ही मालकी सामाजिक होती. पण नंतरच्या काळात गणांत हवा तसा एकोपा राहिला नाही. वैदिक काळात सभा समिती ह्यांचे राजावर चांगलेच नियंत्रण होते. खासगी मालमत्तेची कल्पना त्यात शिरकली नव्हती."[७]

संघाबाबतची बरीचशी माहिती आपणास पाणिनी व कौटिल्य यांच्या ग्रंथामध्ये मिळते. पाणिनी संघांची दोन भागात विभाजन करतो. ( ५.३.११४. १७ ) आयुधजीवी संघ व राजशब्दोपजीवी संघ. कौटिल्य ( ११.१ ) त्यात सुधारणा करून वार्ताशस्त्रोपजीवी व राजशब्दोपजीवी ह्या दोन प्रकारात त्यांची विभागणी करतो. जनपद राज्यांच्या काळात गणराज्ये हा लोकप्रिय प्रकार होता आणि निरनिराळी जनपदराज्ये नृपसत्तेकडून गणसत्तेकडे व गणसत्तेकडून नृपसत्तेकडे परिवर्तन करीत असत. गणराज्यांची परंपरा संमिश्र आहे सर्वच गणराज्ये ब्राह्मणविरोधी नव्हती.

आयुधजीवी किंवा वार्ताशस्त्रोपजीवी संघ हे सैनिकी व व्यापारी गणराज्ये होती. येथे लोक व्यापारी व सैनिकी कारणासाठी एक झाले होते. ह्या प्रकारची गणराज्ये सिंधु खोऱ्यात जास्त प्रमाणात होती. महाभारत ( ८.३० ) सांगते. "वाहिका देशात ब्राह्मण शूद्र, क्षत्रिय किंवा वैश्य होऊ शकतो. तो

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व्हावी होऊ शकतो व पुनः हीन बनतो." मज्झिमनिकाय ( सूत्र १४० ) सांगते की वाहिका देशात फक्त दोनच जाती. आर्य आणि दास आहेत. डॉ. कोसंबी लिहितात "मद्र, गांधार बाल्हीक देशात ग्रीको रोमन पद्धतीची गुलामगिरी विकसित करण्यात आली गंगेच्या खोऱ्यात न बदलणारी संमिश्र अशी वर्ण-व्यवस्था विकसित झाली." [८]

राजशब्दोपजीवी संघ ही एक महाजनशाही होती. येथे सत्ता व अधिकार सत्तारूढ गणामध्ये फिरत होती. सर्व मालमत्ता गणांच्या नावाने होती व गुलामांना त्यांच्या शेतावर काम करावे लागे. काही उमराव स्वतःची खासगी मालमत्ता पण बाळगीत असत.

डॉ. जयमल राय ह्यांच्या मते आयुधजीवी व राजशब्दोपजीवी संघांनी वेगवेगळ्या प्रकारच्या आर्थिक व सामाजिक व्यवस्था अंमलात आणल्या. आयुध-जीवी किंवा वार्ताशस्त्रोपजीवी संघात तसा सामाजिक फरक फारसा नव्हता. व्यक्तीच्या गुणांना तेथे जास्त महत्त्व होते. तेथे आर्य व दास हे दोन वर्ग होते. परंतु ते आर्थिक धोरणावर अवलंबून होते. त्यामुळे हे वर्ग सतत बदलत असत. कधी दासाचा आर्य होत असे कधी आर्याचा दास. या प्रकारच्या संघामध्ये पूर्ण स्वातंत्र्य होते. आयुधजीवी असल्यामुळे त्यांच्या नेत्याला सेनापती म्हटले जात असे. यौधेयांच्या प्रमुखाला महासेनापती म्हटले जात असे. सिंधु खोऱ्यांतील समाजव्यवस्था सुरुवातीला जरी गुलामगिरीवर ( chattel Slavery ) आधारलेली असली तरी नंतरच्या काळात त्या विभागात पण वर्णव्यवस्थेचा स्वीकार केला गेला, पाणिनीच्या काळात पण त्या भागात वर्णव्यवस्था होती. आणि ब्राह्मणांचे प्राबल्य होते. पाणिनी (५.३.११४) ब्राह्मणांच्या आयुधजीवी संघांचा उल्लेख करतो. कौटिल्याने आणि ग्रीक वृत्तांतकारांनी पण त्याचा उल्लेख केलेला आहे. सिंधु खोऱ्यातील समाजरचना जरा गुंतागुंतीची होती. कारण तेथे बहुतेक टोळ्या अजूनही अनार्य होत्या व इराण, बॅक्ट्रिक जवळ असल्यामुळे तेथे गुलामगिरी जास्त मोठ्या प्रमाणात विकसित झाली. पण त्या विभागात संपूर्णतः ग्रीक व रोमन पद्धतीची समाजरचना अस्तित्वात होती म्हणणे फारसे बरोबर ठरणार नाही.

बहुतेक जनपदराज्ये प्रथम वसाहत करणाऱ्या टोळ्यांच्या नावावरून ओळ-खले जात. पाणिनेच्या मते जनपद म्हणजे देश आणि जनपदीन म्हणजे त्याचे नागरिक. नंतरच्या काळात जनपदांनी प्रादेशिक अस्वित्व ग्रहण केले आणि ती संमिश्र अशा राष्ट्रीय संस्कृतीचे केंद्र म्हणून ओळखली जाऊ लागली. डॉ. व्ही. एस्.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अग्रवाल लिहितात " पाणिनीच्या उल्लेखावरून असे दिसते की बहुतेक प्राचीन जनपदांमध्ये प्रथम वसाहत करणारे क्षत्रिय " प्रभावशाली होते आणि राजकीय सत्ता त्यांच्याच हातात केंद्रित झाली होती. पाणिनी ( ४.१.१६८ ) शक्तिशाली सत्ताधारी क्षत्रिय कुलांच्या नावानेच बहुतेक जनपदांची ओळख करून देतो. "[१०]

जनपदांमध्ये विशेषत: गणराज्यांमध्ये राजन्य किंवा क्षत्रिय वर्ण जास्त शक्तिशाली होता. जरी जनपदांमध्ये इतर जातींचे लोक रहात असले तरी क्षत्रियांची सत्ता सार्वभौम होती. पाणिनी ( ४.१.१३७ ) सांगतो की राजन्य म्हणजे राजवंशातील क्षत्रिय. पाणिनीने पुरविलेली माहिती आपल्या दृष्टीने खूप महत्वाची आहे. तो सांगतो की अंधक वृष्णी संघामध्ये शिनी, चैत्रक, वासुदेव इत्यादि कुलांचे वंशज फक्त राजा ही पदवी धारण करतात आणि द्वैप्य किंवा बेटांवर रहाणाऱ्या मूळ रहिवाशांना, ते जरी त्या गणराज्यांशी संबंधित असले तरी ती पदवी धारण करण्याचा अधिकार नाही. (६.२.३४ ) आपणास कालयवनाच्या भीतीमुळे अंधक वृष्णी संघाने मथुरेहून द्वारकेस पलायन केल्याचे महाभारत सांगते. यादवांच्या मूळ वंशातील फक्त १८००० सदस्यांनाच सभेत बसायचा व इतर राजकीय अधिकार भोगण्याचा हक्क होता. द्वारकेस यादवांनी वसाहत केली व त्या बेटावर रहाणारे आदिवासी त्यांचे गुलाम बनले. हेच सूत्र सांगते की हिमालयाच्या पायथ्याशी रहाणाऱ्या लोकांना पण हा अधिकार नव्हता. काशिकासूत्र सांगते की ह्या अंधकवृष्णींना राज्यपदाचा अभिषेक केला जात असे. जातकात पण लिच्छवींच्या पवित्र तळ्याचा उल्लेख आहे. तेथे जाऊन लिच्छवी स्वतःला राजपदाचा अभिषेक करून घेत असत. अंधक वृष्णींच्या सुधर्म सभागृहात १८००० यादव होते. ( सभापर्व १३.५५ ) लिच्छावींच्या सभागृहात ७७०७ राजे होते. व्यासांच्या व यौधेयांच्या सभासद होते. सभागृहात प्रत्येकी ३०० व ७०० सभासद होते. जातक ४५४ व ५४३ सांगतात की कुरूच्या राज्यात ७०० राजे होते व चैत्यांच्या राज्यांत साठ हजार क्षत्रिय राजे होते.

बोंगार्ड लेविन लिहितो, "पाणिनीच्या एका सूत्रांवर ( ४.१.१६८ ) भाष्य करताना पतंजली ( २.२५२ ) सांगतो की शूद्रक मालव गणराज्यात फक्त राजन्यांनाच क्षौद्रक्य व मालव्य म्हटले जात असे. गणराज्यांत पण समाज चार वर्णात व स्वतंत्र आणि गुलाम यात विभागलेला होता. गणराज्यातील वर्णांचे परस्परसंबंध क्षत्रिय वर्णाशी त्या वर्णाचा कसा संबंध आहे यावर आधारलेले होते. राज्याच्या सत्तेत किंवा सत्ताधाऱ्यांच्या संख्येत बदल झाला

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तरी समाजरचनेत तसे फारसे व प्रगतिशील बदल घडून आले नाहीत. क्षत्रियांच्या वर्चस्वाचे महत्त्वाचे कारण त्यांचे सैनिकसामर्थ्य हे होतेच पण त्याबरोबर राजसत्ता, जमिनीची सार्वजनिक मालकी, सत्ताधाऱ्यांची स्वतःची खासगी मालकी ह्यांनी पण महत्त्वाची कामगिरी बजावली."[११]

बोंगार्ड लेविनच्या मते "गणराज्यातील वर्णरचना ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य-शूद्र अशी नव्हती तर क्षत्रिय-ब्राह्मण वैश्य शूद्र अशी होती. एका सूत्रात पाणिनी (५.३.११४) सांगतो की वाहिका देशात ब्राह्मण क्षत्रियांबरोबर रहात असत. ह्या सूत्रांवरचे काशिकाचे पृष्ठ ६६ भाष्य जास्त महत्त्वाचे आहे. ते सांगते की गणराज्यात क्षत्रियांना जास्त महत्त्वाचे स्थान होते आणि काही महत्त्वाच्या प्रसंगी ब्राह्मणांना पण क्षत्रियांबरोबरीचे पद मिळू शके.[१२]

तरी पण ब्राह्मणांचे महत्त्व कमी नव्हते. गणराज्यात व नृपराज्यात त्यांना मानाचे स्थान होते. औंदुबराच्या नाण्यावर विश्वामित्राचे चित्र आहे कारण तो त्यांचा पुरोहित होता. ब्राह्मण बऱ्याच धार्मिक विधीचे पौरोहित्य करीत असत. याबाबत गणराज्ये अतिशय परंपरावादी होती. गौतमबुद्ध वज्जींना त्यांच्या जुन्या देवस्थानांची कुलदैवतांची नेमाने पूजा करावयाची सांगतो. (दीघ्घनिकाय २-७२-७५). पाणिनी पण त्याचा उल्लेख करतो. श्रीकृष्णाने पण गोवर्धन पर्वताची पूजा केलेली आपणास माहीत आहे. ब्राह्मण ह्यावेळी पुरोहित होते की नाही हे माहीत नाही परंतु ते असावे असा अंदाज आहे. कारण ह्या सर्व आदिम कुलपरंपरा ब्राह्मणानी वैदिकधर्माच्या कक्षेत आणल्या होत्या. ब्राह्मण जवळ जवळ सर्व शिक्षणकेंद्रांचे संचालन करीत असत आणि सर्व राजपुत्र व गणराजांचे पुत्र पण विविध विद्यापीठात शिकावयास जात असत. तक्षशिला हे त्यासाठी फार प्रसिद्ध होते. शिक्षणक्षेत्रातील त्यांचा एकाधिकार त्यांच्या वर्चस्वास कारणीभूत होता.

ह्याच काळात अनार्य टोळ्याना आर्यांच्या वैदिक संस्कृतीत सामील करून घेतले जात होते. काही जणाना ब्राह्मण क्षत्रिय जातीमध्ये सामील करून घेण्यात आले असले तरी बहुतेकांची रवानगी शूद्र व वैश्य ह्यांच्यातच करण्यात आली. पतंजली सांगतो की, क्षुद्रक–मालव गणराज्यात दासांना व कर्मकारांना नागरिकत्त्वाचा अधिकार नव्हता. यावरून हे स्पष्ट होते की प्राचीन भारतीय गणराज्ये ही सत्ताधारी राजन्यांची हुकूमशाही ( oligarchy ) होती. प्रथम वसाहत करणारे क्षत्रिय गणच फक्त शक्तिशाली होते आणि बेटांवर रहाणारे मूळ रहिवासी व पर्वतीय लोक यांना कोणतेही अधिकार नव्हते. बहुतेक गणराज्ये आर्यांच्या वसाहती होत्या.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

गणराज्यात पण वर्णव्यवस्था अस्तित्वात होती. प्रा. शर्मा लिहितात की खाजगी मालमत्तेच्या कल्पनेबरोबरच वर्णव्यवस्था निर्माण झाली. शेतीच्या विकासानंतर जमीनदारीची आणि गुलामगिरीची पद्धत निर्माण झाली.[१३] राजन्यांची शेते शूद्र व गुलाम कशीत होते. वैदिक वाङ्‌मयात वैश्यांना राजाचे 'खाद्य' म्हटले आहे. वैश्य हे लहान लहान जमिनीचे तुकडे कसणारे शेतकरी होते. त्यांची आजच्या वैश्याशी तुलना करण्यात अर्थ नाही. यांची परिस्थिती फारशी चांगली नव्हती पण त्यांना आर्य समजले जात असे. शूद्रांची परिस्थिती तर जास्तच खराब होती. त्यांना वर्णव्यवस्थेत परिचर्येचे, सर्व वर्णांची सेवा करण्याचे काम दिले गेले आहे. ते जमिनीशी बांधलेले होते. पाणिनी शूद्रांचा उल्लेख करतांना कांहीना आर्य व कांहीना अनार्य म्हणतो. ( ११.४.१० ) पतंजली सांगतो की शूद्रांचे तीन प्रकार होते. आर्यांच्या समाजरचनेत सामील केलेले शूद्र, न सामील केलेले आदिवासी शूद्र व अस्पृश्य. शूद्रांच्या स्वतःच्या वसाहती वेगळचा ठिकाणी असत. ते पण पशुपालन करीत. पतंजली कारागिरांचा पण शूद्रांत समावेश करतो. तो अस्पृश्य शूद्रांचा पण उल्लेख करतो. शूद्रांकडून काम करून घेतले जात असे आणि पगार म्हणून त्यांना जेवण व कपडे दिले जात असत. पणिनी ( ४.४.६८ ) सांगतो की कामगारांचा पगार अन्न रूपाने दिला जाई. पातंजली व जातक पण याचा उल्लेख करतात. शूद्रांची व दासांची परिस्थिती फारशी चांगली असणे शक्यच नव्हते. गणराज्यात व नृपराज्यात तसा फारसा फरक नव्हता. समाजरचना तीच राहिली.

भारतीय गणराज्यांच्या परंपरा लोकवादाच्या नव्हत्या. भारतीय गण-राज्यांनी संसदीय परंपरांचे पालन केले असेल, गणसभा स्वतंत्र आणि सार्वभौम असतील, त्यात संघमुख्यांवर टीका केली जाऊ शकत असेल. लिच्छवींची न्यायपद्धती बरीच उदारमतवादी व लोकशाहीवादी असेल पण हे सारे राजन्यां-साठी होते ! शूद्रांना व गुलामांना राजन्यांच्या व ब्राह्मणांच्या समान अधिकार मिळावेत अशी मागणी कधीच केली गेली नाही. महाभारतात तुलाधार ( १२.२५०.५४ ) गुलामांना सहानुभूतीने वागवायचे सांगतो. गौतम बुद्ध पण हेच सांगतो. परंतु शूद्र हे मानव आहेत आणि त्यांना इतर माणसां-सारखे अधिकार मिळाले पाहिजेत असे येथे कधीच सांगितले गेले नाही.

किंबहुना मूलभूत किंवा नैसर्गिक अधिकारांची कल्पनाच येथे विकसित झाली नाही. कांही लोकांचे विशेषाधिकार आपल्याला माहीत आहेत पण लोकांच्या अधिकारांची कल्पनाच येथे विकसित झाली नाही. भारतात अधिकार आणि कर्तव्य यांच्यातील संघर्षाची कल्पना उद्‌भवली नाही. येथे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अधिकारांकडे दुर्लक्ष करण्यात आले आणि कर्तव्यावर भर देण्यात आला. कर्तव्यच धर्म बनले. व्यक्तीची कर्तव्ये त्या व्यक्तीचा धर्म बनला. येथे ब्राह्मण क्षत्रियांना विशेषाधिकार होते. वैश्य शूद्रांना साधे मानव अधिकार पण मिळाले नाहीत. हिंदुधर्मशास्त्रज्ञांनी लिहिलेल्या कायद्यांप्रमाणे एकाच गुन्ह्यांसाठी ब्राह्मणांना व शूद्रांना वेगवेगळ्या शिक्षा दिलेल्या आहेत. महाभारतात ( १२. १०८ ) भीष्म सांगतात की संघमुख्यांनी धर्म व व्यवहार ह्यांच्या साह्याने राज्य करावे. याचाच अर्थ असा की काही गणराज्ये ब्राह्मणांचे धर्मशास्त्र पाळीत होते. गणराज्य अनार्य असले तर त्याचे कायदे परंपरावर आधारलेले होते आणि त्या परंपरा प्रतिगामी कुलपरंपरावर आधारलेल्या होत्या.

प्राचीन भारतीय गणराज्यांनी काही अवैदिक, बंडखोर तात्त्विक चळवळींना पाठिंबा दिला असेल पण ब्राह्मणांना शिव्या देणे वेगळे आणि शूद्रांना मानवी अधिकार देणे वेगळे. बुद्ध सांगतो की गणराज्यांनी प्राचीन परंपरांचे पालन करावे; असे कोणतेही कायदे करू नयेत. जे प्रस्थापित कायद्यांच्या विरुद्ध. असतील, आपल्या कुलदैवतांची पूजा करावी. महाभारत पण हे सांगते. काही पुरोगामी सुधारणा घडवून आणाव्या, आपल्या सभेतील सदस्यत्व जास्त सभासदांना द्यावे, लोकांचे नैसर्गिक अधिकार मान्य करावे, ही भारतीय गणराज्यांची उद्दिष्टे कधीच नव्हती. ते परंपरा पालनावर उभे होते. संघटित राजन्यांची ती हुकूमशाही होती. प्रत्येक बाबतीत ते प्रतिगामी होते. त्यामुळेच ते नव्या शक्तीशाली नृपसत्तांपुढे टिकू शकले नाहीत. शाक्य स्वतःच्या वंशाचे पावित्र्य व शुद्धता राखण्यासाठी स्वतःच्याच वंशातील मुलीशी विवाह करीत असत !

प्राचीन भारतात शूद्रांनी किंवा गुलामांनी सत्ताधाऱ्यांविरुद्ध उठाव केल्याची फारशी उदाहरणे नाहीत. शाक्यांच्या राज्यात गुलामांनी बंड केल्याचे एकच उदाहरण सापडते. येथील सत्तांतरे सत्ताधारी वर्गापुरतीच मर्यादित होती. त्यामध्ये लोक फारसे सापडत नाहीत. प्राचीन ग्रीस, रोम व चीनमध्ये गुलामांनी आणि शेतकऱ्यांनी प्रचंड उठाव केलेले आहेत. रोममध्ये नागरिकांनी उमरावांशी भांडून काही मूलभूत अधिकार मिळविले आहेत. प्राचीन ग्रीसमध्ये पण नागरिकांनी व गुलामांनी सतत उठाव करून झगडून काही अधिकार मिळविले आहेत. भारतात असे झाल्याचे उदाहरण सापडत नाही. अशा प्रकारचे काही उठाव येथे पण झाले असतील पण आपल्याजवळ तसा पुरावा नाही. भारतात असे उठाव का झाले नाहीत हा खूप महत्त्वाचा प्रश्न आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. शर्मा सांगतात की धर्म व कर्म या दोन कल्पनांनी याबाबत खूपच महत्त्वाची कामगिरी बजावली आहे.[१८] कर्मसिद्धांत आजही लोकांच्या मनात खोलवर रुजलेला आहे. ह्या जन्मी आपण जे भोगत आहो ते आपल्या मागल्या जन्मीच्या पापांचे फळ आहे. पुढील जन्मी जर आपल्याला उत्तम जन्म मिळवायचा असेल तर चांगले वागले पाहिजे. धर्माप्रमाणे वागले पाहिजे. धर्माप्रमाणे वागणे म्हणजे स्वतःचा धर्म पाळणे, स्वतःचा धर्म पाळणे म्हणजे ब्राह्मणाने चांगला ब्राह्मण बनणे, शूद्राने चांगला शूद्र बनणे—म्हणजेच सर्वांच्या लाथा खात, उष्टे अन्न चाखीत, फाटके कपडे घालीत सर्वांची सेवा करणे. फावल्या वेळात ते आपल्या कर्माला दोष देऊ शकतात. कर्मकल्पनेने सद्यपरिस्थितीतील दुरवस्थेची कारण-परंपरा त्यांच्या मनात रुजविली.

वर्णव्यवस्था ही एक सैद्धान्तिक चौकट होती. भारतात अनेक जाती होत्या. त्या काळात क्षत्रियांनी जिंकलेल्या वेगवेगळ्या गणांना निरनिराळ्या खेड्यात वसविण्यात आले. त्यांना त्यांच्या परंपरा पाळण्याचे स्वातंत्र्य होते. दोन खेड्यांचा फारसा संबंध येत नव्हता कारण आर्थिकदृष्ट्या ही खेडी स्वायत्त होती. मग एक होऊन सत्ताधाऱ्यांशी लढणे दूर. प्रत्येकाची कुलदैवते टोटेमिक परंपरा वेगळ्या होत्या. शूद्र अशी एक जात कधीच नव्हती. सर्व वर्ण असंख्य जातीमध्ये विभागले गेले होते. डॉ. इंगेल्स लिहितो की भारतात ब्राह्मणांनी उदार धोरण अंगिकारले होते. त्यांनी शूद्रांना व वैश्याना ब्राह्मणांचा धर्म पाळण्याचा आग्रह केला नाही.[१९] ब्राह्मणांची ही सहिष्णुता खिश्चन व मुस्लीम धर्मांच्या संदर्भात लक्ष-णीय वाटली तरी त्यातील धूर्तपणा डॉ. इंगेल्सला कळालेला नाही. अर्थात खिश्चनांनी व मुसलमानांनी गुलामांना स्वातंत्र्य दिले नाही ही गोष्ट अला-हिदा पण येथे ब्राह्मणांनी ( म्हणजे प्रस्थापितांनी ) आपले विशेषाधिकार लोकांना द्यायचे मान्य केले नाही. इंगेल्सचे संपूर्ण विवेचन चूक धारणेवर आधारलेले आहे. ब्राह्मणांनी वेगवेगळ्या टोळ्यांना त्यांच्या जुन्या परंपरा पाळावयाचे स्वातंत्र्य देऊन आपले प्रतिस्पर्धी कमी केले. स्वतःच्या उच्च संस्कृतीपासून त्याना दूर ठेवले. त्यांचे हिंदूकरण झाले ते वेगळ्या पद्धतीने. महाभारत् पुराणे ह्यांच्यात त्यांनी त्यांच्या कल्पना परंपरा मिसळून त्याना हिंदु केले. महत्त्वाच्या प्रसंगी स्वतःची उपस्थिती अपरिहार्य केली. त्यांच्या वेगळ्या परंपरा पोसण्यात आल्यामुळे टोळ्या स्वायत्त जाती बनल्या. एका राजकीय किंवा सामाजिक कामासाठी कधीच एकत्र आल्या नाहीत.

प्राचीन भारतात संपूर्ण समाज व संपूर्ण राष्ट्र ही कल्पना कधीच विक-सित झाली नाही आणि असली तरी ती फक्त गणांसाठीच होती. प्रस्थापितांनी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शूद्रांना स्वतःच्या उच्च संस्कृतीपासून दूर ठेवले. ग्रीसमध्ये तीव्र राजकीय हालचालीमुळे व Chattel slavery मुळे गुलामांची परिस्थिती शूद्रांपेक्षा वेगळी होती. गुलाम युद्धकैदी असल्यामुळे सुसंस्कृत होते. गुलाम सांस्कृतिक दृष्टचा वरच्या दर्जाचे असल्यामुळे ते देश, समाज व मूलभूत अधिकार वगैरे कल्पनांच्या संदर्भात विचार करू शकत असत. त्यामुळे संधी मिळताच त्यांनी उठाव केले. येथे ते शक्य झाले नाही. कारण जमीन कसणे, सेवा करणे, कुलदैवतांची पूजा करणे यातच शूद्र मग्न राहिले. नव्या कल्पना त्यांच्याजवळ कधीच फिरकल्या नाहीत. महाकाव्यें व पुराणें वर्णव्यवस्थेचे उदात्तीकरण करीत होते.

वर्णव्यवस्था जातीरूपांनी अजूनही शिल्लक आहे. विरोधाभास असा की लोकशाहीमुळे येथील विविध जाती संघटित होऊन प्रेशर ग्रुप म्हणून काम करीत आहेत! प्राचीन भारतीय गणराज्यात पण ही समाजव्यवस्था अस्तित्वात होती. तिच्यामुळे कोणतीच लोकशाहीवादी कल्पना येथे विकसित झाली नाही. ग्रीकांनी व रोमनांनी तात्विक दृष्टचा तरी माणसांचे नैसर्गिक अधिकार मान्य केले होते पण भारतात हे झाले नाही. नव्या कल्पनाच येथे विकसित झाल्या नाहीत. जुलमी वर्णव्यवस्था बहुसंख्यांवर अत्याचार करीत हजारो वर्षे कायम राहिली.



## संदर्भ


1) D. Chattopadhyay. Lokayat – I.
2) D. Chattopadhyay. Lokayata. 394
3) Dr. Walter Ruben. The beginning of the epic Samkhyas 174–89. Annals of Bhandarkar Oriental Research Institute. Vol. 37. 1956.
4) D. Chattopadhyay. Lokayata III, 178
5) Dr. D. D. Kosambi– Ancient Indian civilization and Culture– VI 165.
6) Dr. Romila Thapar– A history of India. Vol. IV 76.
7) Dr. Jaimal Rai. Rural–urban economy and Sosial changes in ancient India– Introduction. I–74.


अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

8 ) Dr. D. D. Kosambi- Kosambi Commemoration Volume- Science and human progress-Combined Methods in Indology- 23.

9 ) Dr. Jaimal Rai- Ibid. I- 1-74.

10 ) Dr. V. S. Agrawal. India as Known to Panini VII P-1 II 426-27.

11 ) Dr. G. M. Bongard Levin- Studies in ancient India and central Asia- II 154-55.

12 ) Dr. G. M. B. Levin- Ibid II 160.

13 ) Prof. R. S. Sharma- Some economic aspects of the caste system. in ancient India 3.

14 ) Prof. R. S. Sharma- Shudras in ancient India VII 284.

15 ) Daniel H. H. Ingalls - Law and authority in ancient India. 34-45 Journal of American oriental Society the Suppliment. 'Law and authority in ancient orient' Vol. 74, 1954.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

समीक्षा :

## डॉ. मधुकर आष्टीकर

# प्राचीन काव्यशास्त्र

हे पुस्तक लिहिले आहे संस्कृतचे निवृत्त प्राध्यापक श्री. र. पं. कंगले ह्यांनी, अनुदान दिले आहे साहित्य संस्कृति मंडळाने व प्रकाशनाचे श्रेय पदरी पडले आहे मौज प्रकाशनाच्या. संस्कृत काव्यशास्त्रातील प्रधान सिद्धांताचा सामान्य मराठी वाचकाला परिचय करून देणे हा लेखकाचा उद्घोषित उद्देश. लेखकाने या पुस्तकाला प्रबंध म्हटले आहे. संस्कृत काव्यशास्त्रात विलग, फुटकळ लिखाण नसले व प्रकरणे एकाच विषयाला वाहिलेली असली तर त्याला प्रबंध म्हणतात. ही व्याख्या लेखकाने डोळ्यापुढे ठेवून ह्या पुस्तकाला प्रबंध म्हटले असावे.

ग्रंथाची बांधणी करताना ऐतिहासिक वा सांप्रदायिक असा कोणताही एक दृष्टिकोन ठेवून विचार मांडलेले नाहीत. क्षेमेंद्र, कुन्तक, रुय्यक, इन्दुराज, धनंजय, धनिकादींचे विचारधन अस्पृष्ट राहिले आहे.

## कालक्रम न राखणारा इतिहास

पहिल्या प्रकरणात प्राचीन संस्कृत काव्यशास्त्राचा थोडा इतिहास कथन केलेला आहे. इतिहासाला कालक्रमाचे बंधन असावे असे वाटते, पण लेखकाने हा इतिहास सुचेल त्या क्रमाने कथन केलेला दिसतो. कारण 'वक्रोक्ति' हे काव्याचे जीवित मानणारा कुन्तक ११ व्या शतकाच्या आरंभी झाला व ध्वनि-सिद्धांत मांडणारा आनंदवर्धन ९ व्या शतकात झाला. पण लेखकाने आधी वक्रोक्ति सिद्धांत मांडला गेला असे प्रतिपादिले आहे. आणि १०० वर्षांचा कमीतकमी काळ मध्ये असतानाही प्रायः याच सुमारास ( वक्रोक्ति सिद्धांत मांडला गेला त्याच सुमारास ) ध्वनिसिद्धांताची मांडणी करण्यात आली असे विधान केलेले आहे ! ( प्रा. का. शा. पृष्ठ २ ). बरे इतिहास मागेपुढे झाला तर होवो, पण ह्याच ओघात ध्वनिसिद्धांत मांडताना काही भोंगळ विधानेही करण्यात आलेली आहेत. जसे– "ज्या काव्यात व्यञ्जना शक्तीच्या योगाने व्यंग्य अर्थाची प्रतीति होते तेच काव्य उत्कृष्ट काव्य होय, असा हा सिद्धांत आहे." – ही उत्कृष्ट काव्याची व्याख्या बरोबर नाही. 'इदमुत्तममतिशयिनि-व्यङ्गे वाच्याद् ध्वनिरिति बुधैः कथितः" ही व्याख्या किंवा "यत्र व्यंग्यस्य प्राधान्यं तत्रैव ध्वनिः" हे आनंदवर्धनाने पुनः पुनः बजावून सांगितलेले मंत्र-

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वाक्य काय सांगते ? वाच्यार्थापेक्षा व्यंग्यार्थाचे ज्या काव्यात प्राधान्य असते ते उत्कृष्ट काव्य. अशा उत्कृष्ट काव्याला ध्वनि म्हणतात. तसेच हे दुसरे विधानही असेच भोंगळ आहे. " ज्या काव्याच्या व्यंग्यार्थापासून शृंगारादि रसाची प्रतीति होते तेच ध्वनिकाव्य सर्वोत्कृष्ट ठरविले आहे. " हे म्हणणे शास्त्रशुद्ध नाही. कारण शृङ्गारादि रस हाच व्यंग्य असतो व तो वाच्यार्थापासून व्यंजित होतो तसा लक्ष्यार्थापासूनही व्यंजित होतो व त्याचे प्राधान्य असले म्हणजे ते ध्वनिकाव्य उत्कृष्ट ठरते, असे ध्वनिवाद्यांचे प्रतिपादन आहे.

भट्टी आणि भामह तसेच, दण्डी आणि भामह ह्यांच्यातील कालविषयक पौर्वापर्याचा विवेक मात्र श्री. कंगल्यांनी उत्कृष्टपणे प्रतिपादिलेला आहे. मम्मटाच्या भावाचे नाव सर्वत्र प्राय: उव्वट किंवा अल्लट असेच उल्लेखिलेले आहे. पण श्री. कंगले त्याचा अपवादभूत ' अलक ' नावाने उल्लेख करतात ते ह्या ठिकाणी खटकते. बाकी आशयकथन सर्वसामान्यांसाठी ठीक झालेले आहे.

शब्द, अर्थ आणि उक्ति :

ह्या प्रकरणातील आशय, उचित शब्दांत व अत्यंत सुस्पष्टपणे कथन केल्याबद्दल श्री. कंगले अभिनंदनास पात्र आहेत. अभिधा व लक्षणा शब्दनिष्ठ पण व्यंजना ही मात्र अर्थनिष्ठही होय ही ध्वनिवाद्यांची ग्यानबाची मेख लेखकाने हेरलेली दिसते. पण रूढिमूल लक्षणेचे उदाहरण देताना त्यांनी गोंधळ केलेला दिसतो. ' कलिङ्ग: साहसिक: ' हे उदाहरण रूढिमूल लक्षणेचे कसे होणार ? लावण्य, कुशल हीच रूढिमूल लक्षणेची सर्वसम्मत उदाहरणे होत. ' कलिङ्ग ' म्हणजे ' कलिंगडवासी ' असा जो लक्ष्यार्थ घ्यावा लागतो तो ' स्वसिद्धये पराक्षेप: ' ह्या प्रकारच्या लक्षणेत मोडेल. जसे ' कुन्ता: प्रविशन्ति ' किंवा ' मञ्चा: आक्रोशन्ति ' ही उदाहरणे तसेच ' कलिङ्ग: साहसिक: ' हे उदाहरण होईल. ह्याच प्रकरणातील भामहाला स्वभावोक्ति अलंकार मान्य नाही हे लेखकाचे विधान विवाद्य ठरेल. कारण भामहाला जे अलंकार मान्य नाहीत ते त्याने ' नालंकारतया मत: ' म्हणून स्पष्ट सांगितलेले आहेत. स्वभावोक्ति बद्दल मात्र तो तसे म्हणत नाही.

अलंकार प्रकरण :

ह्यात, अलंकार संकल्पनेचा गोषवारा सामान्य वाचकांना सहज समजेल असा कथन केलेला आहे. पण पुनश्च काही विधाने अचूक केलेली नाहीत. मम्मटाने ' रसाद्यनुगत: प्रकृष्टो न्यास: अनुप्रास: ' ही जी स्पष्टीकरणात्मक व्याख्या (अनुप्रास अलंकाराची ) केली तिचा उद्देश अनुप्रास रसहानिकारक होऊ नयेत हे कथन



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

करण्याकडे नसून आणखी इतरत्र आहे, – जसे यमक टाळावे यासाठी. – अन्यथा लाटानुप्रास म्हणजे अनुप्रासच नव्हे असे म्हणण्याची पाळी येईल. म्हणूनच ह्या व्याख्येवर श्री. झळकीकरांचे भाष्य महत्वाचे ठरते. "अनेन यमकव्यावृत्तिः लाटानुप्रासे च नातिव्याप्तिः तात्पर्यभेदप्रतिसंधानेन तत्रापि रसावगमविलम्बात्" (का. प्र. झळकीकर पृ. ४९४) उपमादोषांचे विवेचन करताना, हे स्वतंत्र मानण्याची गरज नाही असे मम्मटाने म्हटले आहे. इत्यादी लेखकाची विधाने मूळ काव्यप्रकाशात ह्या लेखकानेच दिलेल्या काव्यप्रकाश १०–१४२ ह्या संदर्भांशी जुळत नाहीत. लेखकाची काहीतरी गल्लत झालेली दिसते.

## रसविचार :

हे प्रकरण लिहिताना मराठी वाचकातील सामान्यासाठी जर हा सारा खटाटोप असेल तर भरताच्या रससूत्रांचे भट्टलोल्लटादींनी केलेले विवरण श्री. झळकीकरानी सुस्पष्ट केलेले आहे व त्याचा मूळ आधार मम्मटाचे जे विवेचन आहे तेच दिले असते तर अधिक बरे झाले असते. विभाव स्थायींच्या आश्रयाने रहातात हे श्री. कंगले यांचे विधान अनाकलनीय होते ! तसेच उद्‌भटाने, तो चैतन्याचा भेद आहे, हे अत्यंत मौलिक तत्व सांगितले आहे, हे विसरता कामा नये. रससंबद्ध अलौकिकत्वाची कल्पना ह्यातूनच निर्माण झाली हे निःसंशय. भट्टलोल्लटाच्या अनुसंधानाची, "एका ठिकाणी असलेली वस्तू दुसऱ्या ठिकाणी असल्याची कल्पना होणे" ही लेखकाने केलेली व्याख्या रसप्रतीतीच्या संदर्भात अत्यंत ढोबळ व भोंगळ वाटते. तसेच "भोजाचा विशिष्ट शृङ्गाररस म्हणजे कविगत प्रतिभा" असा जो लेखकाने अर्थ केला आहे तोही अव्याप्त आहे. यातून 'परतत्वाचा स्पर्श' असलेले सर्वगत ( कवि व श्रोता ) रसिकत्वच भोजाला अभिप्रेत आहे.

## ध्वनिसिद्धान्त

ह्या प्रकरणांतील ढोबळ तपशील ठीक आहे. पण आनंदवर्धनाच्या ध्वन्यालोकाचे नीट अवलोकन व आकलन लेखकाला करता आले नाही असे खेदाने म्हणावे लागते. प्रस्तुत पुस्तकाच्या पृष्ठ १२० वर लेखकाने आनंदवर्धनाच्या विसंगत विधानांचा उल्लेख करून आनंदवर्धनाला जे दोषी ठरविले आहे, तो दोष खरा श्री. कंगले यांचाच आहे. शब्द व अर्थ ह्या उभयतांच्या शक्तीने निर्माण होणाऱ्या ध्वनीचे उदाहरण म्हणून श्री. कंगले यांनी "दृष्टया केशव गोपराग ..." इत्यादि उदाहरण दिले आहे व ते तसे आनंदवर्धनाने दिले व ते चूक आहे असे म्हटले आहे. पण हे उदाहरण आनंदवर्धनाने दिले आहे हे जरी खरे असले तरी आनंदवर्धनाने ते शब्दार्थोभयशक्तिमूलध्वनीचे उदाहरण म्हणून दिले आहे असे जे


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. कंगले म्हणतात ते मात्र सपशेल चूक आहे. कारण आनंदवर्धनाने ते उदाहरण उभयशक्ति मूल ध्वनी जर पुन: वाच्य झाला तर मात्र तो ध्वनी नव्हे तर गुणीभूतव्यंग्य समजावा असे सांगून त्याचे उदाहरण म्हणून हा श्लोक दिला आहे :

" शब्दार्थशक्त्याक्षिप्तोऽपि व्यंग्योऽर्थः कविना पुन: ।
यत्राविष्क्रियते स्वोक्त्या सान्यैवालंकृतिर्ध्वने: ।। ध्वन्या २।२३
शब्दशक्त्या, अर्थशक्त्या, शब्दार्थशक्त्या वा क्षिप्तोऽपि व्यङ्ग्योऽर्थः कविना पुनर्यत्र स्वोक्त्या प्रकाशीक्रियते सोऽस्मादनुस्वानोपमव्यङ्ग्याद् ध्वनेरन्य एवालंकार: । "
तत्र... उभयशक्त्या यथा... ' दृष्टया केशव गोपरागहृतया " इत्यादौ ।

" दृष्टया केशव गोपरागहृतया । " या श्लोकांत श्री. कंगले म्हणतात, त्याप्रमाणे गुणीभूत व्यंग्यत्वच आहे हे आनंदवर्धनाने म्हटलेलेच आहे. पहा, " सचाक्षिप्तोऽलङ्कारो यत्र पुन: शब्दान्तरेणाभिहितस्वरूप: तत्र न ... ध्वनिव्यवहार: । तत्र वक्रोक्त्यादिवाच्यालङ्कारव्यवहार एव । यथा " दृष्टया केशव गोपरागहृतया । एवं जातीयक: सर्व एव भवतु कामं वाच्यश्लेषस्य विषय: । "
( ध्वन्या. उद्योत २ कारिका २१ व त्यावरील वृत्ति । )

तसेच प्रस्तुत पुस्तकाच्या १२२ पृष्ठावर आनंदवर्धनाच्या लिखाणातील दुसरी एक विसंगती लेखकाने दाखविली आहे ते म्हणतात, " रस गौण स्वरूपात असला तरी तेथे ध्वनिकाव्याचाच प्रकार आहे असे समजावे. रसध्वनि आणि रसवद् अलंकार यात अन्यत्र प्रतिपादिलेल्या भेदाशी हे विधान सर्वथा सुसंगत नाही हे उघड आहे. " पृष्ठ १२२ प्रा. का. शा. पण हीहि चूक आनंदवर्धनाची नसून लेखकाच्याच संदर्भविरहित वाचनामुळे निर्माण झालेली आहे. " रसादितात्पर्यपर्यालोचनया पुन: ' ह्या ओळीचा मागला व पुढला संदर्भ असा आहे की,

" तत्र यस्य युक्ति–सहायता तत्र तेन व्यपदेश: कर्तव्य: ।
न सर्वत्र ध्वनिरागिणा भवितव्यम् । " जर एखाद्या काव्यात गुणीभूतव्यंग्य व ध्वनि एकत्र आले असतील तर वाच्यार्थ व व्यंग्यार्थ ह्यापैकी प्राधान्य कुणाचे ते पहावे व " व्यंग्यप्राधान्ये ध्वनि: ' व ' व्यंग्यगुणत्वे, वाच्यप्राधान्ये गुणीभूतव्यंग्यम् । असे समजावे, असे आनंदवर्धन म्हणतो. मग म्हणतो की ह्या साऱ्या गुणीभूतव्यंग्य प्रकाराचे तात्पर्य वा पर्यवसान जर रसात होत असेल तर तो श्लोक ध्वनीत पर्यवसित होईल, ते ध्वनीचे उदाहरण होईल. श्लोकात रस गौण असताना रसवद् होतो ह्या आनंदवर्धनाच्या पूर्वमताला इथे बाध कसा येतो ? आम्हाला तरी हे कळत नाही ! रस गौण स्वरूपात असला तरी तेथे ध्वनिसंज्ञक काव्याचाच प्रकार आहे, असे समजावे, असे आनंदवर्धन कुठेच म्हणत नाही ! लेखकाला संदर्भ न गवसल्याने व त्याने उल्लेखिलेल्या ध्वन्यालोकांतील ३४० ह्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्लोकावरील पुढील वृत्तीही नीट न वाचल्यामुळे श्री. कंगले यांना असा भ्रम झाला आहे. ह्या ३४० श्लोकावरील वृत्ती अवश्य पहावी. "तस्माद् वाक्यं तत्र ध्वनिः, पदानि तु गुणीभूतव्यंग्यानि।" ...... "न च केवलं गुणीभूतव्यंग्यान्येव पदान्यलक्ष्यक्रमव्यंग्यध्वनेर्व्यंजकानि ...... यत्र तु वाक्ये रसादि तात्पर्यं नास्ति गुणीभूतव्यंग्यैः पदैरुद्भासितेऽपि तत्र गुणीभूत व्यंग्यतैव समुदायधर्मः। यथा—

राजानमपि सेवन्ते विषमप्युपभुञ्जते।
रमन्ते च सह स्त्रीभिः कुशलाः खलु मानवाः॥ इत्यादौ।

पदे गुणीभूतव्यंग्यात्मक पण वाक्यसारांश मात्र ध्वनिस्वरूप असतो हे आनंदाचे प्रतिपादन महत्वाचे आहे. शिवाय रस वा इतर ध्वनि देखील वाच्यार्थ, लक्ष्यार्थ व व्यंग्यार्थ तसेच गुणीभूतव्यंग्यानेहि व्यंजित होतात हे तर ध्वनिवाद्यांचे मुख्य प्रतिपादन आहेच. व त्याचीच चर्चा प्रस्तुत उदाहरणांनी केलेली आहे हे श्री. कंगले विसरले आणि आनंदवर्धनाची विसंगती दाखवायला सरसावले !

अनुमितीत ध्वनि अंतर्भूत होऊ शकत नाही ह्याची ध्वनिवाद्यांकडून प्रतिपादित मुख्य कारणे न देता केवळ वाचकाला अनुमितीचा प्रत्यय येत नाही— म्हणून अनुमितीवाद स्वीकारता येत नाही, हे स्वतःचेच कारण लेखकाने दिले आहे ! वाच्यार्थाने अलंकार व वस्तु सूचित झाल्यास तिथे गुणीभूतव्यंग्य प्रकारच नेहमी होतो आणि म्हणून "अलंकारेण वस्तुध्वनि" हा प्रकार संभवतच नाही हे प्रतिपादन ध्वनिवाद्याच्या दृष्टीने महत्वाचे होते पण त्याचा उल्लेख नाही ! तसेच प्रस्तुत पुस्तकात व्यंग्यार्थाने सूचित होणारा दुसरा असा अलंकार मुख्यतः अतिशयोक्ति होय असे आनंदवर्धन म्हणतो असे उल्लेखिले आहे ! पण इथे अतिशयोक्ति शब्द मुख्यतः अलंकार या अर्थामध्ये नाही हे तिथल्या संदर्भाने समजते. तसेच "वाच्य स्वरूपात अलंकाराची योजना केलेली असता जेव्हा दुसऱ्या एखाद्या अलंकाराचे अथवा वस्तूचे सूचन होते तेव्हा तो सुद्धा गुणीभूतव्यंग्य काव्याचाच प्रकार"— अशी प्रस्तुत लेखकाने अत्यंत भोंगळ व दिशाभूल करणारी व्याख्या केली आहे व त्याच्या समर्थनार्थ आनंदवर्धनाने "सैषा सर्वैव वक्रोक्तिः।" चा जो उल्लेख केला तो दिला आहे. मुळात दुसरेच प्रतिपादन आहे ! "भामह व दंडीला काव्यात रसाचे महत्वाचे स्थान असते, असे वाटले नाही, हेहि लेखकाचे विधान अत्यंत धाडसाचे आहे ! तसेच ध्वन्यालोक ग्रंथांत "प्रारंभीच असे म्हटले आहे की, काव्यांपासून ज्या अर्थांचा बोध होतो तो वाच्य आणि प्रतीयमान ( व्यंग्य ) असा दोन प्रकारचा असतो." हे लेखकाचे प्रतिपादनही असेच भोंगळ व दिशाभूल करणारे आहे. ह्या प्रतिपादनाचा आधारभूत श्लोक पहा —

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

योऽर्थः सहृदयश्लाघ्यः काव्यात्मेति व्यवस्थितः ।
वाच्य–प्रतीयमानाख्यौ तस्य भेदौ उभौ स्मृतौ ॥

जो अर्थ सहृदयश्लाघ्य असतो, त्याचे दोन भेद, ह्याचा अभिनवगुप्ताने अंश असा अर्थ घ्यावा म्हणून सांगितले आहे. प्रकार असा अर्थ घेऊ नये कारण ती महान चूक ठरेल. ( नव्हे विश्वनाथाने तसा अर्थ मुद्दाम घेऊन आनंदवर्धनावर टीका केलेली आहेच ). कारण प्रतीयमानार्थ वाच्यार्थानेच सूचित होत असतो. तेव्हा अर्थाचा वाच्य प्रकार, त्या प्रतीयमानाचा प्रकार कसा होईल ? श्री. कंगले यांनी लोचन वाचावा म्हणजे त्यांची चूक त्यांच्या लक्षात येईल. वास्तविक हा उल्लेख टाळताही आला असता. कारण सर्वसामान्यांना काव्यशास्त्रीय सिद्धान्तांचा परिचय करून देताना ह्या विवाद्य नाजूक बाबींचा उल्लेख आवश्यक ठरू नये.

कविव्यापार

" साधुकाव्यनिषेवणम् ' असा पाठ अभिनवगुप्ताने लोचनात स्वीकारला आहे ( तो बरोबर नाही ? ) व त्यामुळे हे सर्व लाभ वाचकाला होत असल्याचे गृहीत धरले आहे, " हे लेखकाचे विधानही बरोबर नाही. अभिनवगुप्ताने घेतलेला ' साधुकाव्य–निषेवणम् ' हा पाठच योग्य असून त्यामुळे ' निर्माण ' व ' श्रवण ' हे दोन्ही अर्थ उपात्त होतात हे ' उद्यानविवृत्ती ' नामक काव्यालंकारावरील टीकेत दाखविलेले आहे. ' निषेवणमिति पाठे सहृदय-कर्तृको रसास्वादपरिचयः कविकर्तृकः काव्यनिर्माण–यत्नश्च तन्त्रेणोपात्त इति वेदितव्यम् " ( उद्यानविवृत्ति पृ. २ ) त्यामुळे काव्य निर्माण करून कवीला कीर्ति मिळते व श्रवणाने सहृदयाला आनंदप्राप्ती होते असे स्पष्ट लिहिले आहे. तेव्हा अभिनवगुप्ताने हे ' सर्वलाभ ' वाचकाला होत असल्याचे गृहीत धरले आहे हे कंगल्यांचे विधान चूक ठरते.

" रसाच्या आविष्कारामुळे जुने अर्थही नवीन भासतात. याची अनेक उदाहरणे आनंदवर्धनाने दिली आहेत. " असे कंगले लिहितात पण लेखकाचे हे विधान ध्वन्यालोक नीट न वाचल्याचेच निदर्शक आहे. ग्रंथ वरवर चाळला असे स्पष्ट दिसते. कारण रसामुळे जुने अर्थ नवे भासतात असे कारिकेत जरी म्हटले आहे तरी वृत्तीमध्ये विवक्षितान्यपरवाच्यस्यैव शब्दशक्त्युद्भवानुरणन-रूपव्यङ्ग्यप्रकार-समाश्रयेण नवत्वम् " असे म्हणून आनंदवर्धनाने उदाहरणे दिलीत ती सर्व विवक्षितान्यपरवाच्यसंलक्ष्यक्रमव्यंग्यध्वनीमुळे जुने अर्थ कसे नवे वाटतात ह्यांचीच ना; की लेखक म्हणतात तशी रसामुळे जुने अर्थ नवे कसे वाटतात त्याची. पहा–

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तस्यैवार्थशक्त्युद्भवानुरणनरूपव्यंग्यसमाश्रयेण नवत्वम्। यथा एवंवादिनि देवर्षौ इत्यादि श्लोकस्य–

कृते वरकथालापे कुमार्यः पुलकोद्गमैः।
सूचयन्ति स्पृहामन्तर्लज्जयावनताननाः ।।
इत्यादिषु सत्सु। ( ध्वन्या० उद्योत ४।४ वृत्ति )

अर्थात् कारिका व वृत्ति आणि उदाहरणे ह्यांचा मेळ आनंदवर्धनाने अनेकदा नीट घातलेला नाही. तो ते करू शकला नाही कारण उपलब्ध फुटकळ कारिकांच्या आधारे त्याने आपला वृत्ति व उदाहरणरूप ग्रंथ लिहिला आहे, हे आम्ही आमच्या 'ध्वनिसिद्धान्त' ह्या ग्रंथांत विस्ताराने दाखविलेले आहे. ( पहा ध्वनिसिद्धान्त पृ. ६६ ते ९७ ) द्विपदी, शम्या, रसिक, स्कन्धक आदि अभिनेयार्थ म्हणजे संगीतिका, गीति नाटच किंवा Operas म्हणा होत. लेखक त्यांना नृत्याचे प्रकार म्हणतात ते तितकेसे उचित नाही.

पाश्चात्य Criticism व भारतीय काव्यशास्त्र ह्यांच्या संबंधावरील भाष्यही अत्यंत एकांगी झालेले व बाळबोध स्वरूपाच्या वादांची चर्चा त्यात आलेली आहे. प्राचीन काव्यशास्त्रात applied Criticism नाही हा मुख्य दोष दाखवावयाला हवा. Poets Personalities चा कुन्तकाने सूत्ररूपाने केलेला उल्लेख लेखकाने द्यायला हवा होता. अॅम्बिग्युईटीच्या तत्वाचा ध्वनीच्या संदर्भात विचार केला असता तर बराच नवा प्रकाश लेखकाला टाकता आला असता. संस्कृतच्या परिभाषेबाबत ती जुनाट व दुर्बोध वाटते हे लेखकाचे मत फारसे पटत नाही. त्या कालदृष्टचा जुन्या आहेत ह्यात वाद नाही पण आशयदृष्टचा आजही उपयुक्त म्हणूनच तेवढयाच ताज्या आहेत. आज नव्या जाणिवांच्या नव्या परिभाषा तयार करताना त्यांचा अमाप व अचूक उपयोग होतो हे कवि अनिलादींनी चांगल्या प्रकारे प्रतिपादिलेले आहे. तिकडे लेखकाने लक्ष द्यायला हवे. एकूण हे पुस्तक मराठी वाचकांतील सामान्यासाठी म्हणावे तर अनेक ठिकाणी वाचकांची ह्या विषयाची पूर्वतयारी गृहीत धरलेली आहे, व ह्या शास्त्राच्या जाणकारासाठी हे पुस्तक आहे म्हणावे तर गलथानपणा व मूळ ग्रंथ नीट न वाचण्याची बेपर्वाई ह्यामुळे त्यांच्या पदरांत फार मोठी निराशा पडते आहे. ग्रंथसूचीतील पुष्कळशा ग्रंथांचा तर केवळ सूचितच उल्लेख आढळतो. लेखकाची भाषा मात्र सुबोध व प्रवाही आहे. अनेक तपशील त्यांनी मेहनतीने गोळा केलेले आहेत व 'घागर में सागर' भरण्याचा यथामति अल्पस्वल्प धाडसी प्रयत्न केला आहे. त्याबद्दल लेखकाचे अभिनंदन.

◆ ◆ ◆ ◆

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चर्चा :

श्री. श्री. रा. टिकेकर

# जोतिबा : शोध आणि बोध

आपल्या जानेवारी अंकातला डॉ. ढेरे यांचा हा लेख उद्बोधक आहे. त्याला पुष्टिदायक आणि काही ि काणी विरोधक अशी पुष्कळ माहिती " श्रीसोमनाथ-तीर्थ " ( ले. गौतमबुवा पाठक ( नासिक स. १९५९ ) या ग्रंथात आलेली आहे. तिजकडे डॉ. ढेरे यांचे लक्ष गेलेले दिसत नाही.

शिवदर्शन ( कला दुसरी पृ. ४–२१ ) या प्रकरणातील बहुतेक माहिती डॉ. ढेरे यांनी वाचली असती तर त्यांचा युक्तिवाद अगदी निराळ्या प्रकारे झाला असता. स्थल, जल, वायु आणि ज्योति अशा चार प्रकारची लिंगें असतात. ज्योतींची पूजा भारतात आणि भारताबाहेर कोठे आढळते; हे सांगताना ( पृ. ८ ) ज्योतिबाचा डोंगर ज्योतीचा असावा असे मत व्यक्त झाले आहे.

रुद्र, सूर्य आणि अग्नी यांची एकरूपता दाखविणारी चर्चा (पृ, १७-२१) ही विशेष महत्त्वाची ठरते.

श्री. गौतम बुवा पाठकानी काबूलच्या आसमाई मंदिराचा आणि बाकूच्या देवळाचा उल्लेख केला आहे. पैकी आसमाईचे मंदिर मी स्वत: पाहिले असल्याने पाठकांना दुजोरा देता येतो. वेदमूर्ति सातवळेकराच्या सांगण्यावरून बाकूच्या मंदिराची पुष्कळ माहिती व छायाचित्रे जमविली असल्याने पाठकांचे त्याबाबतचे म्हणणे रास्त आहे असे मी म्हणतो.

जोतिबाचा " जोत " या शेतीच्या अवजाराशी संबंध जोडताना डॉ. ढेरे यांनी थोडी घाई केली आहे असे वाटते. त्या डोंगराचे नाव जोतबा असते तर डॉ. ढेरे यांचे म्हणणे रास्त ठरले असते. पण जोतिबा हे नाव असल्याने " जोत "शी नाते जुळत नाही. "हर"बा, ( हरि किंवा नरहरी-ऐवजी ) कोंडबा, धोंडबा ( कोंडीबा, धोंडीबा ) हे पर्याय पत्करण्याची मराठी विशेषनामांची प्रवृत्ति लक्षात घेता " जोतबा " आणि जोतिबा यातील फरक स्पष्ट जाणवतो आणि " जोत " पायावर रचलेला सारा तर्क ढासळतो. जोतिबाच्या डोंगरावर जवळपास कुठे तरी ज्योति निघत असली पाहिजे– जशी ती ज्योतिर्लिंगांच्या ठिकाणीही निघत असावी.

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

"केदार" शब्द क्षेत्रवाचक आहे खरा; पण ते साधे क्षेत्र नव्हे. पाण्याने भरलेले, तुंबलेले क्षेत्र असा विशिष्ट. अर्थ आहे. आणि उद्धृत उताऱ्यावरून त्याला पुष्टि मिळते.

कार्तिकेयाचे वाहन. मोर आणि मोर तर सर्पभक्षक. म्हणून धान्य भांडारांवर. खेड्यापाड्यातील घराच्या भिंतींवर ओबड धोबड का होईना मोराचे चित्र काढतात. अशा मयूरवाहनी कार्तिकेयाचा नागराजाशी निकटचा संबंध कसा जुळतो? अय्यप्पन, शास्ता हा वास्तविक हरिहर पुत्र. ही कथा डॉ. ढेरे यास ठाऊक असावी. त्याचे भक्त कडक व्रत करणारे असतात; ४० दिवस अगदी काळे कपडे नेसून रहातात ... त्या हरिहर पुत्राशी इतर कोणाही देवतेशी साम्य कसे आढळेल?

योगेश्वरीबद्दलही उपपत्ति जरा घाईने लावलेली दिसते. नर्मदा किनारी भेडा घाट जवळ, खजुराहोच्या एका मंदिरात आणि ओरिसामध्ये हिरापूर आणि राणीपूर या दोन मंदिरांत अशा निदान चार ठिकाणी ६४ योगिनींच्या मूर्ती आढळतात. त्यांचा अभ्यास करून विविध मते पुढे आली आहेत. त्यांचा विचारही न करता योगेश्वरीची इतक्या झटपट वासलात लावणे बरे नव्हे. खुद्द कोल्हापुरातल्या अंबाबाई (महालक्ष्मी) मंदिरात काही योगिनींची शिल्पे आहेत असे म्हणतात.

रत्न (त्ना) गिरी हे नाव कुणी पेटंट घेतलेले दिसत नाही. ओरिसात देखील ते बरेच विख्यात आहे. एवढ्यावरून कोकणातील रत्नागिरीशी त्याचे नाते कसे जुळविता येईल? शिवाय ग्राम नामच गिरीवाचक असल्याने डोंगराला ते सहजच लावता येते. सिंधमार्गे दर्यावर्दी रीतीने येणारांना पश्चिम किनाऱ्यावरील इतर पुष्कळ बंदरे आधी आणि सहज लागतील. रत्नागिरी हे तसे सोईचे बंदर नाही. त्यावेळीही नसावे. म्हणून रत्नागिरीला सिंधमधील जुने रहिवासी उतरले– ते सिंदे होत, हे अनुमान तपासून घेतले पाहिजे. ते पटत नाही. इराणातून पारशी देखील पश्चिम किनाऱ्यावर उतरले. त्या सर्वांना इराणी-फार्सी-पारशी हे सामान्य नाव असले तरी त्यांची कुलनामे निराळी आहेत, हे आपणास ठाऊक आहे.

डॉ. ढेरे यांनी या सर्व गोष्टींचा विचार करावा आणि नंतर आपले मत व्यक्त करावे, अशी नम्र विनंती करावी असे वाटते.

◆ ◆ ◆



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'प्राज्ञ' प्रकाशन :

# ज्ञानदेव चिंतन

संपादक :

डॉ० वसंत स० जोशी

प्रस्तावना :

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

'नवभारता'च्या 'ज्ञानेश्वर विशेषांका'तील सर्व लेख शिवाय विवेचक प्रस्तावना आणि डॉ. निशिकान्त मिरजकर यांचा 'चांगदेव पासष्टी'वरील लेख यांचा अंतर्भाव प्रस्तुत ग्रंथात राहील.

पृष्ठे सुमारे २५० : मूल्य वीस रुपये.

लिहा :

चिटणीस, प्राज्ञ पाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

